॥ श्रीराम ॥

# माईसाहेब

( सामाजिक गद्य नाटक )



— लेखक —

नारायण विनायक कुळकर्णी

— प्रकाशक —

बलवन्त पुस्तक भाण्डार,
गिरगांव नाका, मुंबई ४



बलवन्त प्रकाशन
गिरगांव मुंबई

क्रमांक २६

आवृत्ति २ री

मार्च; १९५४

किंमत १॥ रुपया

# दुसरी आवृत्ति

कै० नानबा गोखले यांच्यानंतर त्यांची 'लोकमान्य नाटक मंडळी' हि लवकरच नामशेष झाली. त्यानंतर '**माईसाहेब**'चे प्रयोग करण्याचें 'समर्थ मंडळी'नें ठरवून नवा ऋणानुबंध जोडला. हा ऋणानुबंध आम्हां उभयतांस सुखदायी होवो अशी श्रीचरणीं प्रार्थना आहे. पहिल्या आवृत्तींत व्याकरणाच्या, छपाईच्या वगैरे चुका बऱ्याच राहिल्या होत्या त्या ह्या आवृत्तींत शक्य तितक्या सुधारण्याचा प्रयत्न केला आहे व अगदींच किरकोळ स्वरूपाच्या दुरुस्त्या केल्या आहेत.

या आवृत्तींत '**समर्थ नाटक मंडळी**' चे मालक व नट यांनीं फोटो दिल्याबद्दल, त्यांचे आभारी आहों.

ता. ११।११।२९ **ना. वि. कुलकर्णी**

---

# आवृत्ति तिसरी

ती. कै. भाऊंच्या 'माईसाहेब' नाटकाची ही तिसरी आवृत्ति वाचकांच्या हातांत देतांना मनाला विशेष आनंद होत आहे. **श्री. परचुरे**, मालक, '**बलवंत पुस्तक भांडार**' यांनीं शक्य तितकें नीटनेटकें व आकर्षक स्वरूपांत आपुलकीनें पुस्तक प्रकाशित केल्याबद्दल त्यांचे आभार मानणें कर्तव्यच आहे. तिसरी आवृत्ति काढण्याचा सुयोग आल्याबद्दल वाचकांचाहि मी ऋणी आहें.

सुरली, ता. : कराड,
जि. : उ. सातारा.

**मुकुंद ना. कुलकर्णी**
२३-२-५४

नाटककार

# कै. नारायण विनायक कुलकर्णी



जन्म
२४ जुलै, १८९२

मृत्यु
१२ जानेवारी, १९४८

## कै. नारायण विनायक कुलकर्णी

# अल्प परिचय

सुप्रसिद्ध महाराष्ट्रीय नाटककार ती. ना. वि. कुलकर्णी यांचा जन्म २४ जुलै १८९२ मध्यें सुरली या खेड्यांत झाला. त्यांचीं वयाचीं पहिलीं बारा वर्षें याच खेड्यांत गेलीं. बाराव्या वर्षीं 'श्रीगणेशा'ची सुरवात झाली. मराठी शिक्षण सातारा जिल्ह्यांतील कालें गांवीं झालें. घरीं आजोबा पोथ्या पुस्तकें वाचीत त्यामुळें वाचनाचा नाद लहानपणींच लागला. १९०९ सालीं मराठी शिक्षण पुरें झालें. १९१० सालीं पुणें गांठलें. इंग्रजी शिक्षणासाठीं पुण्यास आले तरी, तीन वर्षें मराठी शिक्षकाची नोकरी कँप स्कूलमध्यें केली. १९१४ सालीं लग्न झालें व विवाहाच्या पहिल्याच रात्रीं पळून पुण्यास येऊन दाखल झाले. दिवसा नोकरी व रात्रीं शिक्षण असा क्रम त्यांनीं चालू केला. त्याच सुमारास कै. हरीभाऊ आपटे यांच्याकडे लेखनकामाठी केली. ह्यामुळें हरिभाऊंच्या सोज्ज्वल लेखनाचें बाळकडू त्यांच्या लेखणींत रुजलें गेलें. गरिबीमुळें शिक्षणाकरितां, फी, पुस्तकें यांची अडचण तीव्रतेनें जाणवूं लागली. शिक्षणांत लक्ष लागेना. वडील बंधूंच्यामुळें नाटकें पाहण्याचा-वाचण्याचा छंद लागला. त्याच वेळीं कै. खाडिलकरांच्या तेजस्वी नाटकांकडे त्यांचें मन आकर्षिलें गेलें व नाटकांत खूप पैसा मिळतो या कल्पनेमुळें आपणहि नाटकें लिहावींत असें त्यांचे मनानें घेतलें. नाटककार होण्याची महत्त्वाकांक्षा बळावली. शिक्षण चालू असतांनाच 'पार्थ-प्रतिज्ञा' नाटक लिहिलें. तें १९१६ सालीं रंगभूमीवर आलें. वयाच्या २५ व्या वर्षी मॅट्रिकमध्यें जाण्याचा सुयोग आला. नंतर शिक्षणास रामराम ठोकून त्यांच्या आवडत्या व्यासंगाकडे त्यांनीं आपलें लक्ष केंद्रित केलें.

**नाटकें**— (१) पार्थ-प्रतिज्ञा (२) डाव जिंकला (३) उदयकाल (४) माईसाहेब, (५) कान्होपात्रा (६) मोहिनी (७) मंगल-भुवन (८) नवीन कल्पना (९) क्षमेची क्षमा इत्यादि नाटकें रंगभूमीवर आलीं. 'माईसाहेब' नाटकानें शाश्वत असें स्थान त्यांना मिळवून दिलें. मराठी रंगभूमीवर तें अजिंक्य असेंच ठरलें. १९३० सालीं गंधर्व नाटक-मंडळीनें 'कान्होपात्रा' हें भक्तिरसपूर्ण नाटक मुद्दाम मागवून घेऊन रंगभूमीवर आणलें. त्यांच्या नाट्यकलेच्या सेवेबद्दल, महाराष्ट्रीय रसिकांनीं १९४३ सालीं सांगली येथें भरलेल्या नाट्य-संमेलनाचें अध्यक्षपद देऊन त्यांचा गौरव केला. त्यांच्या नाटकांची संख्या २५ पर्यंत

गेलेली आहे. 'तुकाराम' नाटक श्री. बालगंधर्वांकरितां मुद्दाम त्यांनीं लिहिलें. तें जर नानांच्या हयातींत रंगभूमीवर आलें असतें तर त्यांच्या नाट्यलेखनाचा इतिहास वेगळाच घडला असता. 'तुकाराम' नाटकाचें हस्तलिखित ज्यांनीं ज्यांनीं वाचलें त्यांनीं त्यांनीं नानांचे लेखन-कौशल्याची तारीफ केली. मृतवत् रंगभूमीस 'तुकाराम' नाटक संजीवनीच आहे असे तज्ज्ञांनीं उद्‌गार काढले. मनोरंजनाबरोबर लोकशिक्षणहि त्यांच्या नाटकांत आहे.

१९२५ सालीं 'महाराष्ट्र-कुटुंब-माला' ही संस्था त्यांनीं त्यांचे परमप्रिय मित्र श्री. विठूकाका खाडिलकर यांच्या सहकार्यानें सुरू केली. 'मजूर' ह्या पहिल्याच कादंबरीनें महाराष्ट्र-वाचकांचीं मनें आकर्षून घेतलीं व मराठी वाङ्मयांत आवश्यक असें नवें दालन उघडलें गेलें. 'मजूर' कादंबरीनें लेखकांना व वाचकांना एक नवीनच दिशा दाखवून दिली. मजुरांची दु:स्थिती, गिरणी-कामगारांची बेपर्वाई इत्यादि गोष्टींचें वर्णन या कादंबरींत आहे. 'कसे दिवस जातील!' 'माणिक' इत्यादी कादंबऱ्यांतून गोदींतील कामगारांचे संप, खेड्यांतील इनामदारांची केविलवाणी परिस्थिती इत्यादि विषय घेतले आहेत. उपेक्षित समाजाचीं सालस चित्रें सोप्या भाषेंत रंगविलेलीं यांच्या कादंबऱ्यांतून दिसत व तीं आनंदानें वाचणारा एक मोठा वर्ग होता. मालेतर्फें त्यांनीं एकूण तेहतीस पुस्तकें प्रकाशित केलीं त्यांपैकीं सोळा कादंबऱ्या त्यांच्या स्वतःच्या आहेत. मालेंतील कांहीं पुस्तकें मुंबई व नागपूर विद्यापीठाच्या अभ्यासक्रमांत नेमलीं होतीं, हेंच मालेच्या मोठेपणाचें गमक होय.

१९११ सालीं 'सुशिला-माधव' ही त्यांची पहिली गोष्ट चित्रमयजगत्-मध्यें प्रसिद्ध झाली तेव्हांपासून तों १९४७ पर्यंत त्यांनीं सुमारें ३०० गोष्टी लिहिल्या. परंतु त्यांचे कथासंग्रह असे दोन-तीनच आहेत.

१९३१ सालीं महाराष्ट्रांत बोलपटांचें युग अवतरल्यानंतर, मराठींतील पहिल्याच मराठी बोलपटाचें कथानक लिहिण्याचा अपूर्व मान ती. नानांना मिळाला. प्रभात फिल्म कंपनीनें आपला व मराठींतला पहिला बोलपट 'अयोध्येचा राजा' जो काढला होता त्याचे कथा-संवाद त्यांनींच लिहिले. त्यानंतर माया-मच्छिंद्र, माया-बाजार हीं बोलपट-कथानकें त्यांनीं लिहिलीं. बोलपट-निर्मात्यांच्या आग्रहामुळें, 'मेनका', 'नयनबाण', 'कर्ण' इत्यादि पटकथा त्यांनीं लिहिल्या; पण त्या पडद्यावर येऊं शकल्या नाहींत.

कै. नानांची रहाणी अत्यंत साधी होती. ते बहुश्रुत होते. त्यांचा चाहाता वर्ग व मित्रपरिवार फार मोठा होता. नानांचें चरित्र श्री. विठूकाका वाडिलकरांच्या उल्लेखाशिवाय पूर्ण करितां येणार नाहीं. पुण्यांत त्यांचें स्वावलंबी शिक्षण चालू असतां, त्यांना हा जो निःस्वार्थी मित्र व निरपेक्ष उपकारकर्ता भेटला त्यामुळेंच त्यांच्या आयुष्यास व्यवस्थित वळण लागलें. या दोघांचें एकत्र कुटुंब हें दृश्य खरोखर दुर्मिळ होतें. पुढें दुसऱ्या महायुद्धामुळें निर्माण झालेल्या कागदाचे महर्गतेमुळें, नानांना 'माला' बंद करावी लागली.

पदवी, संपत्ती, प्रतिष्ठा यांपैकीं एकीह पदरीं नसतांना, केवळ लेखनाच्या हव्यासामुळें व दुर्दम्य महत्त्वाकांक्षेनें ते लेखनाच्या आखाड्यांत उतरले व आपल्या लेखणीच्या सामर्थ्यावर पहिल्या दर्जाचे नाटककार, कष्टाळू कथा-लेखक, कवि, ध्येयनिष्ठ कादंबरीकार, चतुरस्र पटकथालेखक असें अष्टपैलू सव्यसाचित्व त्यांनीं सिद्ध केलें.

१२ जानेवारी, १९४८ रोजीं रक्तदाबाचे विकारानें वयाच्या ५६ व्या वर्षी पुणें मुक्कामीं नाना कालवश झाले.

मुकुंद ना. कुलकर्णी

# माईसाहेब

## अंक १ ला

### प्रवेश १ ला

[**स्थळ :** अणासाहेबांचें घर, उत्तमाची खोली. उत्तम अभ्यासांत गढून गेला आहे, टेबलावर पुस्तकें अस्ताव्यस्त पडलीं आहेत, समोर ठेवलेल्या घड्याळांत नऊ वाजायला आले आहेत, असा पडदा उघडतो. कमला प्रवेश करते.

**उत्तम :** ( वाचतां वाचतां इकडे तिकडे पाहतो, त्याच्या पाठीमागें त्याची बहीण कमला उभी असलेली दृष्टीस पडते. ) कोण ? कमू, तूं का आतां मला हांका मारल्यास ?

**कमला :** होय दादा, मींच तुला हांका मारल्या. तुझ्या पाठीशीं केव्हांची येऊन उभी राहिलें आहें मी, पण तुला त्याची दादहि नाहीं ! अरे, घड्याळाकडे तरी पाहिलंस का ? नऊ वाजायला आले आहेत ! दिवा मालवायचंहि तुला भान नाहीं, काय रे हें !

**उत्तम :** खरेंच कीं कमू ! माझ्या तें ध्यानांतच आलं नाहीं. पण आतां मनाला कांहींच रुखरुख राहिली नाहीं; सगळ्या विषयांची रिव्हिजन कशी चोख झाली.

**कमला :** अभ्यासाच्या नादांत रात्रींचा निजलासुद्धां नसशील ! परीक्षा परीक्षा झाली म्हणून काय झालं ! कांहीं शरीराकडे पहायला नकोच का ? अरे, आपणच आपल्या शरीराकडे पहायला पाहिजे. जाग्रणानं डोळे पहा कसे लाल गुंजेसारखे दिसताहेत ! विश्रांतीकरितां जमिनीला अंग तरी लावलं होतंस का ?

**उत्तम :** मुळींच नाहीं. अभ्यासाचा पुढें पर्वत पडलेला ! आज माझी परीक्षा— अन् मी निजतोंय अन् विश्रांति घेतोंय काय ? कमले, आपल्या विश्रांतीचे आणि शांत रीतीनं झोंपायचे दिवस फार पुढें आहेत. आपली सुखाची झोंप आणि विश्रांति आपली आई मेली त्या वेळींच नाहींशी झाली आहे. तिनं पुनः —निदान लवकर—जन्माला येऊं नये म्हणून आमच्या करड्या नशिबानं आमच्या

माईसाहेबांचा जागता पाहारा ताबडतोब ठेवला आहे ! आणि तूं म्हणतेस मीं जमिनीवर अंग टाकलं होतं का ?

**कमला** : तें खरें रे दादा ! पण—

**उत्तम** : पण–पण काय ताई ?–मी माझ्या पहिल्या परीक्षेला बसणार ! माझ्या परीक्षेच्या रिझल्टाकडे आज किती लोकांचे डोळे लागून राहिले आहेत, त्याची तुला कल्पना नाहीं का ?–मनुष्याच्या आयुष्यांत महत्त्वाचीं बरींवाईट स्थित्यंतरें होण्याचे जे प्रसंग असतात, त्यांपैकीं विद्यार्जनाचा प्रारंभकाल होय आणि तो मला माझ्या सुदैवानं लाभतो आहे. मागं अशाच दुसऱ्या एका प्रसंगीं मीं अज्ञपणानं म्हण कीं कशानंहि म्हण, बराचसा चुकून पुष्कळशा ठेंचा लागून पायाचीं बोटं फोडून घेतलीं आहेत. आपली आई मरून दुसऱ्या माई जेव्हां घरीं आल्या आणि त्यांच्या खरबरीत गोंजारण्यानं आमच्या पाठीचीं धिरडीं होऊं लागलीं, त्यावेळीं मी एकदां नव्हे तर दोनदां पळून जाऊन नाटक कंपन्या आणि हॉटेलं यांचा आश्रय केला होता. आपल्या मामानें तिथून परत आणण्याचे उपकार माझ्यावर केले आणि म्हणूनच मला इतक्या तीव्रतेनें माझ्या मार्गाला चिकटण्याची बुद्धि झाली. मी मार्गांतून जाऊं लागलों म्हणजे भलत्या वेळीं भलताच अविचार करून आपल्या कुळाला कलंक लावण्यासारखं कृत्य करून आयुष्याचा नाश करीत होतों, ही जाणीव माझी मला तर आंतून सारखी टोंचीत असतेच; पण वाटेवरील लोकहि माझ्याकडे बोटं दाखवून माझी कुचेष्टा करीत असतील, या कल्पनेनं मला ओशाळल्यासारखं होऊन वाटेंतून जातांना वरदेखील पहावत नाहीं. हॉटेलांत राहण्यांत आनंद मानणारा आणि नाटकाच्या नादांत गुरफटलेला, त्याचं चित्त एके ठिकाणीं कोठून असणार? आणि हा परीक्षा तरी कसल्या देणार? म्हणून माझी काळजी वाहणारा माझ्या नात्यागोत्याचा प्रत्येक जण मनाशीं म्हणत असतो ! अण्णासाहेब याच विचारांनीं साशंक असतात, मामालाहि मधूनमधून अशीच शंका सतावीत असेल; आणि असें भविष्य केव्हां खरें होतं आणि आपण देवाचा नवस फेडतों, म्हणून माईसाहेब उत्कंठित असणार ! केशवमामांना तर तें हवेंच आहे ! मग तूंच सांग, कमले, तूंच सांग, त्या मानानं मी परीक्षेची काळजी करितों, ती कमीच नाहीं का ?

**कमला** : काळजी वहावी, नाहीं कोणी म्हटलंय. पण जिवाकडे कांहीं तरी पाहिलं पाहिजे का नको ! बरं त्यांतून तुला तितकी काळजी करण्याचें कारण

आहेच असं नाहीं. परीक्षेंत तूं पहिला आल्याशिवाय राहणार नाहींस, असं तुझ्या हायस्कुलांतील तुझे साह्याध्यायीच काय पण शिक्षकदेखील म्हणतात, म्हणून तुझे ते मित्र भय्यासाहेब सांगतात. मग रे इतकी काळजी कसली करायची ?

**उत्तम** : मग काय ? त्यांनीं हरभऱ्याच्या झाडावर चढविलं कीं, फुशारून जाऊन स्वस्थ बसावं आणि शेवटीं सर्वांच्याच उपहासाला कारण व्हावं असं तुझं म्हणणं ?

**कमला** : तसं नव्हे रे ! तूं बोलायला लागलास म्हणजे दुसऱ्याचा उपायच खुंटतो. बरं स्नान तरी कर, ऊठ. आज परीक्षेला तुला लवकर जायचं आहे ना—

**उत्तम** : वा ! स्नान पहांटे चार वाजतांच झालें ! पहांटे थोडा कंटाळा आल्यासारखा झाला, म्हणून उठलों, स्नान केलं; तेव्हां मला पुन्हां अभ्यासाला तरतरी आली. तूं माझ्या खोलींत दार उघडून आल्याचेंदेखील माझ्या ध्यानांत आलं नाहीं ?—नाहीं का ! खरंच, आज माझी परीक्षा ! आपली आई असती तर तिला किती आनंद झाला असता ! मला परीक्षेला लवकर गेलं पाहिजे म्हणून आईची कोण धांदल उडून गेली असती ! शेजारणीपाजारणींना आणि आपल्या बरोबरच्या मैत्रिणींना 'माझ्या उत्तमची परीक्षा आहे' असें सांगतां सांगतां तिला पुरे झालं असतं. मला पाटावर बसवून, माथ्यावर तेल घालून मला तिनें मंगलस्नान घातलं असतं. एक कीं दोन ! कमले, काय असेल तें असो, रात्रीं केव्हांपासून तरी मला आईची एकसारखी आठवण होते आहे. मीं विसरण्याचा किती तरी प्रयत्न केला, पण ती विसरतच नाहीं !—आई ! आई ! आज आई असती तर ! ( दोघांच्या डोळ्यांना पाणी येतें ) हं ! कमले, डोळ्याला पाणी नको आणूं. मीं आईची आठवण काढली नसती तर बरं झालं असतं, असं तूं रडायला लागलीस म्हणजे मला वाटायला लागतं ! डोळे मिटले कीं, आईची मूर्ति अगदीं पुढं उभी असल्याचा भास होतो; पण किनई, ती अगदीं समाधानी असल्यासारखी दिसते. न जाणो आईचा आत्मा आपल्यासभोंवतीं फिरत असून, आज माझ्या परीक्षेंत 'यशस्वी हो' म्हणून आशीर्वाद देण्याकरितांच तर घुटमळत नसेल ! आई 'यशस्वी हो,' असा तुझा या मुलावर वरदहस्त असल्यावर या घरांत सर्वत्र उदासीनता जरी पसरली असली, तरी त्या उदासीनतेचा परिणाम माझ्या मनावर मुळींच होणार नाहीं. कमले, आईच्या आशीर्वादानं माझं मन यावेळीं कसं प्रसन्न झालं आहे ! तोच आशीर्वाद तुला आणि मला भावी आयुष्यांत सुखाचे दिवस खचित दाखवील ?—तुझा झाला का अभ्यास ? तुलाहि शाळेंत जायचें आहे ना ? जा पाहूं अंग धुऊन घे. दोघेंहि बरोबरच जेवून बाहेर पडूं.

**कमला :** मला अंग धुवायला कितीसा उशीर लागणार; पण माईचा स्वयंपाक तरी झाला पाहिजे? त्यांनीं हांक मारल्याशिवाय आपण गेलों तर-माईसाहेब आहेत त्या. हजार बोलून राहायच्या नाहींत. त्यांतून आतां बाबू झाल्यापासून आम्हांला कसं छळूं आणि किती छळूं असं माईना झालेलं आहे. अण्णासाहेबांनीं असं नी तसं बोलायचं सोडून दिलं आहे. त्यानं माईला तर हातीं राज्य आल्यासारखें झालें आहे जसं कांहीं! माईच्या माऱ्यापुढं तें जेवण नको का खाणं नको—उपाशी राहिलं तरी पुरवलं, असं होऊन जातं—पण करायचं काय? आमची आई असती तर आम्ही खात नाहीं म्हणून तिला वाईट वाटलं असतं.

**उत्तम :** पण आम्हांला दोन वेळां जेवण घालावं लागतं म्हणून तरी माईना वाईट वाटतं ना? कुणीकडून तरी वाईट वाटलं म्हणजे झालं! अगदीं खाणावळीप्रमाणं कां होईना, दोन वेळेला तरी माई आपल्याला जेवायला घालतात ना? मग त्यांचे उपकार नकोत का मानायला त्याबद्दल? हो! त्यांनीं जर तुम्हांला उपाशी रहा म्हणून सांगितलं—तर तुम्हांला उपाशी राहायला पाहिजे. [ शाळिग्राम येतो.

**शाळिग्राम :** खरोखरीच आज तुम्हां दोघांना उपाशी राहिलं पाहिजे. कारभारी केशवमामांनीं तुम्हांला सांगायला सांगितलं आहे कीं आज दोघें उपाशी राहा.

**कमला :** कां रे, कां? आज आम्हांला उपाशी ठेवण्यापर्यंत कां मजल आली?

**उत्तम :** कां म्हणजे? केशवमामांची लहर!

**शाळिग्राम :** नाहीं, आज केशवमामांची लहर नाहीं पण आज माईसाहेबांच्या पोटांत दुखतंय्! आज चूलदेखील पेटविली नाहीं. अण्णासाहेबांना कुठंसं जेवायला जायचं आहे. केशवमामा जाणार आहेत मुंबईला, मग स्वयंपाकाची काय घाई? माईसाहेबांच्या तर पोटांतच दुखत आहे.

**कमला :** दादा आज परीक्षेला जायचा म्हणून पोटांत दुखत असेल! शाळिग्राम, दादा आज उपाशीच का परीक्षेला जायचा? तूं आठ वाजतांच सांगायला आला असतास—( उत्तम कपडे घालूं लागतो. ) तर?—दादा, तूं कपडेसुद्धां घालायला लागलास? थांब, मी इतक्यांत पिठलं भात करतें—साडेनऊ झाले म्हणून काय झालं? उपाशीच कसा जाणार तूं?

**उत्तम :** न जायला काय झालं? आजपर्यंत कधीं मला उपाशी राहावं लागलं नाहीं कीं काय? का मी कधीं उपाशी राहिलों नाहीं? माईच्या पोटांत दुखायला लागलं तर त्या काय करणार? आणि आतां तूं पिठलं भात केव्हां करणार?

आज माझी परीक्षा हें माईसाहेबांना माहीत असतांना, त्या मुद्दाम का करतील असं ?

**शाळिग्राम** : न करायला काय झालं ? ( तोंड वाईट करून ) तरी मला वाटलं ! माईसाहेबांना जर माहीत होतं, तर त्यांनीं सकाळींच मला हांक मारून कमळीला सांगायला पाठवायचं कीं नाहीं ? तिनं केलं असतं जेवण तयार. कमळीला काय येत नाहीं ? रोजच्याप्रमाणं ती आपल्या खोलींत अभ्यास करीतच बसली असेल. तूं कांहीं म्हण उत्तम-माझे काळ्याचे पांढरे या तुझ्या घरांतच झाले-मला कांहीं कळत नाहीं म्हणून समजतात काय घरचीं माणसं ? मी तुमच्या घरांत तुमच्या आजोबापासून आहें. प्रसंग आला तर अण्णासाहेबांच्या समोर मी ताडफाड बोलायला कमी करायचा नाहीं. माईसाहेब झाल्या म्हणून काय झालं ? तुम्ही मला कशाला दाबतां ? मनांत आलं तें बोलून दाखवायला कुणाची चोरी ? मला कुणाची भीति ?

**उत्तम** : अरे पण हो-हो ! तूं तुझ्याकरितां नको भिऊंस, पण आमच्याकरितां तर भिशील कीं नाहीं ? तूं जाशील सहज बोलून, पण त्रास होईल आम्हांला !

**शाळिग्राम** : बरं, आज तुमची परीक्षा ! कांहीं तजवीज करायची ? माईसाहेब तर मुलाला घेऊन निजलेल्या ! जसें कांहीं मुलखावेगळं यांनाच मूल झालं आहे !

**कमला** : पुन्हां आपलं तेंच ! माईसाहेबांच्या राज्यांत मुख्य मंत्री केशवमामा आहेत; अण्णासाहेबांच्या हातांत कांहींच सूत्रें नाहींत, हें तूं विसरलास वाटतं ?

**शाळिग्राम** : मला काय जरूर तें लक्षांत ठेवायची ? मी अण्णासाहेबांचं अन्न खातों-त्यांची आणि तुमची चाकरी करायची येवढेंच माझं काम ! दुसऱ्या-तिसऱ्याशीं मला काय करावयाचं आहे ?

**उत्तम** : मग गप बैस तर कसा ! बरं, कमळे, तूं तरी आपल्या पोटाची कांहीं व्यवस्था पाहा ! माझ्यासारखी तुझी कांहीं आज परीक्षा नाहीं कीं तुलाहि घाईनें उपाशीच राहिलं पाहिजे ?

**कमला** : माझं मी पाहीन रे ! तुला निदान चहा तरी करून देऊं काय ?

**उत्तम** : वाटेंत चहाचीं हॉटेल्स् काय थोडीं आहेत ? चहाच्या नको भानगडींत पडूंस ! चहानं पित्त वाढतं आणि चहाकरितां धूर निघालेला माईंनीं पाहिला, तर त्यांचं पित्त उचलेल, तेव्हां राहूंदेच तें ! ( पडद्यांत :—'देशपांडे, देशपांडे' अशा हांका ऐकूं येतात. ) कोण ? भय्यासाहेब आला वाटतं ? जातांना हांका मारतों म्हणाला होता. ओ-ओ-ओ. तयार आहें मी ! [भय्यासाहेब प्रवेश करतो.]

**भय्या०** : का ? अगदीं तयारी का ? मी म्हटलंच तरी, देशपांड्यांची आज तयारी नसायची म्हणजे काय ? आमच्या स्कूलचें निशाण म्हणजे देशपांडे ! आणि त्यांची आज कुठून दिरंगाई असायला ? [ कमलेकडे पाहून ] आज भगिनीही निरोप द्यायला सज्ज आहेत ! साहाजिक आहे ! आज बंधुराज स्वारी मारून येणार आहेत. [ कमला लाजते. उत्तम हंसतो. ] खरं कीं नाहीं ? बरं चला.

**उत्तम** : चला. पण अजून अवकाश आहे ना ? बैस तर खरा. जायचं आहेच. [ भय्यासाहेब बसतो. ] मी तुझी वाटच पहात होतों.

**भय्या०** : म्हणूनच मीं अगदीं घाईनं आलों. येतांना मनांत म्हणत होतों कीं, देशपांड्याला अर्ध्या जेवणावरून उठविण्याइतकी घाई करायची. पण तुम्ही कसले हुशार ? [ भय्यासाहेब हंसतो. ]

**शाळिग्राम** : [ स्वगत ] हुशार म्हणजे काय विचारतां ? अर्धपोटीं नव्हे तर उपाशीच जायची यांची तयारी !

**भय्या०** : किती वेळ वाट पहात होतास माझी ? किती वेळ झाला जेवून ?

**उत्तम** : बराच वेळ झाला कीं !

**शाळिग्राम** : [ स्वगत ] बराच म्हणजे—सबंध रात्र गेली आहे मध्यें ! [ उघड ] अहो, यांचं जेवण—

**कमला** : शाळिग्राम, माई उठल्या का बघरे ! बाबू रडत असला तर पहा अन् मला सांगायला ये–[ शाळिग्राम जातो. ]

**उत्तम** : ( स्वगत ) शाबास कमल तुझी ! भोळ्या शाळिग्रामाला युक्तीनं आंवरून, आपलं गृहछिद्र योग्य प्रकारं तूं झांकून ठेवलंस. ( उघड ) साडेअकराला आपला पेपर आहे ना ? कसं होईल त्याची थोडी काळजीच आहे मला !

**भय्या०** : तुला ? आणि परीक्षेची काळजी ? भले शाबास ! मग माझ्यासारख्यानं काय म्हणावं ? बरं झालं, हे पहा तुझे केशवमामा आले ! ( केशवमामा येतात ) काय केशवमामा, तुमच्या भाच्यानं असं म्हणायचं म्हणजे न्यायच झाला कीं नाहीं ? तुम्हीच सांगा !

**केशव०** : काय म्हणताहेत राजेश्री ? अन् तुम्ही केव्हां आलांत ?

**भय्या०** : मी आतांच आलों. तुमचा भाचा परीक्षेची काळजी करतो आहे काय होईल म्हणून ! आतां तुम्हीच सांगा, आमच्या स्कूलचं हें भूषण आणि यांना म्हणे परीक्षेची काळजी ?

**केशव०** : ( कपाळाला आंठ्या घालून ) मला बुवा आश्चर्य वाटतं तुम्हां सर्वांचं ! आमच्या उत्तमाला तुम्ही सगळ्यांनीं काय म्हणून इतकं चढविलें आहे तेंच कळत नाहीं. ( कमळेकडे पाहून ) कमळे ! अजून तूं इथंच आहेस का ? तिकडे माई तुला केव्हांची शोधते आहे ! बाबू रडतो आहे, अन् तूं इकडे ! ( कमळी जाते ) तुम्ही चढवितां उत्तमाला कीं, भयंकर अभ्यासी आणि हुशार म्हणून ! हुशार म्हणावा तर त्याच्या तोंडावरची माशी सुद्धां उठत नाहीं. अभ्यासी म्हणून म्हणतां पण अभ्यासांत गुंतला आहे असं तर मी मुळींच पाहात नाहीं—

**भय्या०** : आपण घरीं असाल तर बघाल कीं नाहीं ? आपण घरांत असतां कुठं ? शिवाय आपला मुलगा कितीहि हुशार आणि अभ्यासी असला, तरी घरच्या मंडळींना तो तसा आहे, असं वाटतच नाहीं. आपण त्याची स्तुति करण्यापेक्षां दुसऱ्यांनीं त्याच्या गुणांचं वर्णन करणं अधिक चांगलं, असाही त्यांत वडील मंडळीचा हेतु असतो, हें मला कबूल आहे.

**केशव०** : नाहीं, म्हणजे तसा माझ्या बोलण्याचा हेतु नाहीं. अभ्यास करीत असेल, तसा तो बरा असेल, पण एकंदरींत काय, तो तरतरीत नव्हे. सांगण्याचा हेतु हा ! आतां तुमचीच गोष्ट घ्या–तुमची बरोबरी उत्तम करील ? मी विचारतों तुम्हांला, करील का बरोबरी ?

**भय्या०** : ( हंसून ) भलतंच कांहीं तरी ! तुम्ही एकाद्याला क्षुद्र लेखायला लागलांत म्हणजे बेसुमार करतां–माझी आणि तुमच्या उत्तमाची बरोबरी होईल काय ? तुम्ही जर उत्तमाचे मामा नसतां, तर उत्तमाचा हाडवैरीदेखील त्याच्या हुशारीबद्दल उद्गार काढणार नाहीं, असं तुम्ही बोलतां असं मीं तुम्हांला म्हटलं असतं.

**उत्तम** : ( शांतपणानें ) पण हा वाद कशाला भय्यासाहेब ! माझ्या हुशारीबद्दल जिथं माझी मला शंका आहे, तिथं तुम्ही कांहीं म्हटलंत तरी त्याचा काय उपयोग ? शिवाय मामा सांगतात त्यांत खोटं तरी काय आहे ?

**भय्या०** : गप्प रे ! ह्या बोलण्यांत काय अर्थ आहे ? मामासाहेब, तुम्हांला कसं काय वाटत असेल तें वाटो, पण उत्तमानं मला आपला मित्र म्हणविलं आहे आणि हें मी माझं भाग्यच समजतों. पण खरं सांगायचं म्हणजे उत्तमाबरोबर फिरतांना, माझ्या मठ्ठपणाच्या जाणिवेमुळें माझी मलाच लाज वाटते.

**केशव०** : ( निर्लज्जपणानें हंसून ) त्याच्या हुशारीमुळें त्याच्या बरोबर फिरायला लाज वाटते कीं, घरून पळून जाऊन, हॉटेलांत कपबशा विसळण्याची आणि

नाटक कंपन्यांतून उष्टींखरकटीं काढण्याचीं कामं करणारा म्हणून त्याच्याबरोबर फिरण्याची लाज वाटते ? ( उत्तम खालीं मान घालतो ) आपलीं मुलं चांगलीं असलीं तर चांगलीं म्हणावींत ! वाईट असलीं तरी चांगलीं म्हणणारा माणूस मी नाहीं.

**भय्या०** : ( स्वगत साश्चर्य ) किती दुष्ट मनुष्य आहे हा ! ( उघड ) कांहीं तरी बोलायचं म्हणून बोलतां झालं केशवमामा तुम्ही ! अशी गोष्ट निदान या वेळीं तरी तुम्हीं बोलायची नव्हे ! उत्तमाला किती झोंबलं असेल बरं तुमचं बोलणं ! आज त्याची परीक्षा, अशा वेळीं तुम्ही त्याला गोड बोलून उत्तेजन द्यायचं, तें हें काय भलतंच बोललांत ! मी उत्तमाचा स्नेही नसतों आणि अनोळखी तिऱ्हाईत असतों तरी मला राग आला असता, इतकं कडू जहर बोललांत ! जाऊं द्या. आम्ही हा विषयच सोडून देतों, उत्तम, चलतोस ना ?

**उत्तम** : तुला भलतीच पंचाईत लागते बघ भय्यासाहेब !

**केशव०** : तुम्ही त्याचे स्नेही आहांत, तेव्हां तुम्हांला राग यायचाच. पण बघा, त्याला कांहीं राग आला का ? आम्हीं बोलतों तें तरी कशाकरितां ? त्यानं शुद्धीवर यावं–चांगल्या परीक्षा उतराव्या–नांवलौकिकाला चढावं म्हणूनच ना ? तुम्हांला माझं बोलणं चमत्कारिक वाटतं–बरं मी तरी कशाला वाढवूं ? कायरे उत्तम, केली आहेस का परीक्षेची तयारी तरी ? केल्यासारखें एकदां पास तरी व्हा. नाहींतर इकडे अण्णासाहेबांचा पैसा खर्च व्हायचा आणि तुमच्या चालल्याच आहेत पंढरीच्या वाऱ्या ! झाली आहे का परीक्षेची तयारी ?

**उत्तम** : ( उदासपणानें ) हो, बहुतेक झालीच आहे !

**केशव०** : बघा, कसं कचरत उत्तर येतं तें ? ज्याला आत्मविश्वास नाहीं आणि ज्यानं तयारी केली नसेल, त्याचंच असं उत्तर यायचं ! बाकी नाहीं परीक्षा उतरली तर तुला काळजी कशाला हवी म्हणा ! तुला काय कित्येक हॉटेल्सचीं, कित्येक खाणावळींचीं, कित्येक नाटक कंपन्यांकडचीं बोलावणीं असायचीं. आचारी–पाणके यांची त्या मंडळींना नेहमीं जरूर असतेच ! त्यांतून तुझ्यासारख्या होतकरू व अनुभवी तरुणाची वरणी अगोदर लागायची ! ( भय्यासाहेब चिडतो. उत्तमाला भोंवळ येऊन तो भय्यासाहेबांच्या खांद्यावर डोकें टेकतो.) पण कायरे, तुला हॉटेलांत जाणं परवडतं कीं नाटक कंपनींत ? हॉटेलांत चाहिल ते पदार्थ चाखण्याला नेहमीं मिळतात, तर नाटक मंडळींत पीटच्या डोअरवर बसून सोबत्यांना फुकट सोडण्याची संधि मिळते !

**भय्या०** : बस् करा मामासाहेब! उत्तम, मला तूं उगाच आपल्या घरीं बोलावलंस! केशवमामा, तुम्हांला कांहीं हृदय आहे काय? आपल्या घरच्या बाबतींत बोलायचं कारण आणि अधिकार नाहीं, पण मला बोलल्याखेरीज रहावत नाहीं! शिवाय, तुम्ही उत्तमाला मानानं वडील असलां तरी वयानं खास नाहीं; तेव्हां तितकं स्पष्ट बोललों तर राग येऊं देऊं नका! तुम्हीं उत्तमाचे सावत्र मामा झालांत, म्हणून कांहीं सात जन्मींचे त्याचे हाडवैरी नव्हत. तुम्ही आपल्या कृतीनं शकुनीमामांना–पण ते आपल्या भाच्यावर प्राणापलीकडे प्रेम करीत होते–कंसमामांना लाजिवलंत यांत शंका नाहीं. उत्तम, आपण उगाच थांबलों.

**केशव०** : कांहीं केलें तरी लोक आम्हांला असं म्हणायचेच. पण ईश्वरसाक्ष—

**भय्या०** : कशाला ईश्वराच्या नांवानं जिव्हा पवित्र करण्याचा प्रयत्न करतां? पुन्हा सावत्र म्हटलं तर राग येतो. मी म्हणतों, शिस्त लावण्यासाठीं–जरी स्वतःच्या हृदयाला आंतून घरे पडत असून बोलतां असं धरून चाललों तरी–तरवारीच्या धारेवर धरलीं म्हणजेच मुलें मनासारखीं वागतात असं नाहीं.

**केशव०** : मग काय बोलणं सोडून देऊन, त्याला खुशाल नाटकांत जाऊं द्यावं म्हणतां? तें चांगलं?

**भय्या०** : त्यांत तरी काय बिघडतं असं मी तुम्हांला विचारतों?

**उत्तम** : राहूं दे म्हणतों ना भय्यासाहेब—

**भय्या०** : थांबरे! आज तुमच्या जरबेनें तो नाटकाकडे गेला नाहीं आणि उद्यां ग्रॅज्युएट झाल्यावर नाटकधंद्याकडे वळला तर त्यांत काय बिघडलं? शिक्षण झाल्यावर नोकरीच केली पाहिजे असं कुठें? नोकरीखेरीज जगांत प्राणिमात्राला दुसरा तरणोपायच नाहीं काय? उत्तमाचे वडील, तुमचे मेव्हणे त्या मुंबई ऑफिसांत दिवसाचे अठरा तास खपतात, नोकरींत राबतात–काय सुख जेवतात? मी तुम्हांला विचारतों नोकरीसाठींच शिक्षण करायचं का? नोकरी! नोकरी–नोकरीच्या मोहानें–मुंबई ऑफिसकडे सकाळीं आठ वाजण्याच्या आंत जातांना आणि संध्याकाळीं साडेसात वाजल्यानंतर परत येतांना तरुण, मुलें, वृद्ध वगैरे सुशिक्षित हमालांचा तो प्रचंड तांडा पाहिला म्हणजे आमच्या देशाची दैन्यावस्था विक्राळ जबडा पसरून देशाला ग्रासायला बसली असल्याचं उघड उघड दिसतं. असं हें भेसूर सत्य दिसत असतांहि तुमच्यासारखी मंडळी, एखादा मनुष्य नोकरीचा नाद सोडून धंद्यांत शिरतो असं पाहून त्याला भंडावून सोडूं लागतात, याला काय म्हणावं?

**केशव०** : ( हंसून ) शाबास आहे आपल्या शहाणपणाची ! नोकरी करायची सोडून, नाटकाचा धंदाः काढून तुम्ही आपला दरिद्री देश धनसंपन्न करणार म्हणायचे ? शाबास ! शाबास ! मला वाटतं आपणहि शिक्षण संपल्यावर नाटक-धंदाच काढणार ! तुम्हांला नोकरीची काय आवश्यकता ? कसं झालं तरी पांचपंच-वीस हजारांचे तुम्ही इनामदार ! घरचं भांडवल तुम्ही घालाल ! पण आमचा उत्तम काय करील ? नाहीं तर त्याला नाटकं लिहायला शिकवा ! तो लिहील तुमच्या कंपनीकरितां नाटकें !

**भय्या०** : बस् करा ! फार झालें ! चल उत्तम, पाय काढच आतां ! ! आहे ना सायकल ? आपण दोघेहि सायकलवरच जाऊं !

**केशव०** : छेः छेः, सायकल मला हवी आहे. मी आतांच अकराच्या ट्रेननं मुंबईला निघालों आहें ना ? तुम्हीं दोघे आहांत, टांग्यांतून जा. नाहींतर तुमची आहेच सायकल—उत्तम जाईल पायीं. देवाच्या दर्शनाला पायीं गेल्याशिवाय पुण्य लागत नाहीं ! परीक्षेला जायचं तिथं सायकलीचं सोंग कशाला ? आणि तुला पाहिजेच असेल तर जातां जातां स्टेशनवर येऊन सायकल घेऊन जा. भय्यासाहेब, तुम्ही फार रागावलांत ! माझी तशी कल्पना नव्हती ! असो; झालं तें विसरून जा. उत्तम, तूं परीक्षेंत पास होशील असा माझा तुला आशीर्वाद आहे. अरे, नमस्कार तरी कर मला ? आणखीं अण्णासाहेबांना आणि माईंना नमस्कार केल्याशिवायच का जाणार ? बघा भय्यासाहेब, मी बोलतों म्हणून आणखीं तुम्हांला राग येतो. जा हं सायकल घेऊन स्टेशनवरून. ( झटक्यानें जातो. )

**उत्तम** : भय्यासाहेब !—

**भय्या०** : कळलं तूं काय सांगणार आहेस तें ! जा बाबा स्टेशनवर. तुला गेलंच पाहिजे. न जाऊन सांगतोस कुणाला ! बाकी इतकं अवलादीचं वीष यांच्यांत भरलं असेल अशी माझी कल्पनादेखील नव्हती ! तूं आणि कमल कसं हें सहन करीत असाल तें तुमचं तुम्हांला माहीत !

**उत्तम** : ( विषण्णतेनें हंसून ) हं ! अरे, या खंदकापलीकडच्या गोळया ! पण शत्रूचा प्रत्यक्ष मारा—आमच्या माईसाहेबांच्या तोफेचा धडाका तुला माहीत नाहीं ! आम्ही लहानपणापासून तो सोशीत येऊन जिवंत राहिलों आहों पुन्हां हें विशेष नाहीं का ! बरं पण जा आतां तूं पुढें, मी आलोंच मागून स्टेशनवरून ! होईल थोडा उशीर, पण वेळेच्या आंत खचित येतों.

( जायला निघतात. तोंच ऑफिसला जायला निघालेले अण्णासाहेब दारांतूनच डोकावतात, त्यांना पाहून भय्यास ) अरे, अण्णासाहेब आले.

**अण्णा०** : आज तुझी परीक्षा ना रे ? किती वाजतां सुरुवात आहे ? जायची वेळ झाली आहे ना ? कांहीं आहे का बरा विचार ? लावा दिवे, पडूंदे एकदां प्रकाश ! अजून खोलींतून बाहेरच पडला नाहींस वाटतं ? आणखीं, अरे, जायच्या वेळेपर्यंत मुलाला इकडेतिकडे घेऊन फिरवलं असतंस तर ? घरचीं कामं कांहीं करायचीं नाहींत, असा निश्चयच केला आहेस कीं काय ? कमळीचाहि ठिकाणा नाहीं ! घरीं एकट्या माणसाला त्रास होतो–कामं उरकत नाहींत, त्यांतून आज पोटांत दुखत होतं–एवढंहि आतां कळूं नये कारे तुम्हांला ? कां हेंहि सांगायला पाहिजे ? ( उत्तम मुकाट्यानं नमस्कार करतो. ) नीट शुद्धीवर राहून प्रश्नांचीं उत्तरं लिहा– ( अण्णासाहेब जातात. )

**भय्या०** : मला तुझं आश्चर्य वाटतं. तूं कुणापुढं कांहींच कसा बोलत नाहींस ? आपलं बरोबर असो अगर चुकीचं असो–ऐकून घ्यायचं, उत्तर द्यायचं नाहीं, हें कुठलं धोरण ? अशानं तुझ्या अंगाला तरी काय लागणार ? अशानं मरशील कीं लवकर ! तुला काय तोंड नाहीं ?

**उत्तम** : बरं जा तूं, जाऊं दे तें; तूं जा पाहूं, नाहीं तर खरोखरच उशीर होईल !

**भय्या०** : तूं येशील ना लवकर ?

**उत्तम** : त्याची तुला नको काळजी ! ( भय्या जातो ) भय्यासाहेब मला विचारतो 'तुला बोलायला तोंड नाहीं का ?' नाहीं, मला बोलायला तोंडच नाहीं ! मी काय बोलूं आणि मी बोलून माझं ऐकणार कोण ? हा ! केशव–नव्हे कठोर-मामा हा असा ! अण्णासाहेब सर्वस्वी माईसाहेबांच्या ओंजळीनें पाणी पिणारे ! मी कुणाला काय बोलणार आणि माझं ऐकणार कोण ? सर्वांचें ठीक चाललें आहे ! ठीक कां, चैन चालली आहे ! हाल काय ते आम्हां दोघांचे–माझे आणि कमळीचे ! केशवमामा आले–क्षतावर मनसोक्त घाव घालून गेले. अण्णासाहेबांनीं एकदोन शब्दांनीं शोभा केली; पण–पण माझ्या उपाशी पोटाची चाकशी एकानं तरी केली काय ? त्यांतल्या त्यांत मामांना स्टेशनपर्यंत हेलपाटा देण्यांतच मौज वाटली ! आमच्या उपाशी पोटाची चौकशी करण्याची कोणाला काय जरूरी ? तीच आमची आई असती तर ? आई, आई, अहाहा ! आईचं स्मरण होतांच मन पुन्हां ताजंतवानं झालं, पोट भरून आलं आणि शरीरांत नवीन उत्साह निर्माण झाला आईच्या कल्पनेंत तल्लिन झाल्यावर मी जेवलों नाहीं हेंहि

विसरून गेलों ! आई हें अमृत आहे ! आई ! तुझ्या आठवणीचं अमृत पिऊनच मी परीक्षेला जातों ! बा उपाशी पोटा ! तूं उपाशी असल्याची कागाळी करणार नाहींस ना आतां ? आई, आज मी उपाशी पोटीं असलों, तरी तूं दुःखीकष्टी होऊं नकोस–माझं सारंच आयुष्य असं उपाशी पोटीं खचित जाणार नाहीं. उद्यां माझ्या परीक्षा होतील, मी मिळविता होईन आणि तुझ्या आशीर्वादानं मी पोटभर जेवेन; इतकंच नव्हे तर यथाशक्ति दुसऱ्यालाहि वाढीन. बा उपाशी पोटा ! मातेची ममता पित्याला यायची नाहीं, म्हणूनच मोरोपंतांनीं "प्रसाद पट झांकिती परि परा गुरूचें थिटें" म्हटलं आहे, त्याकडे लक्ष देऊन तूं अण्णासाहेबांवर रागावूं नकोस. उपाशी पोटीं कामाला हात घातल्याखेरीज त्या कामाची कळ लागत नाहीं, या उदात्त भावनेनं, तूं परीक्षेत दुर्लक्ष करूं नयेस म्हणून तुला उपाशी ठेवण्याची योजना मुद्दामच माईसाहेबांनीं केली आहे, असें समजून त्यांचे तूं उपकारच मान. ( घड्याळ पाहून ) अरे, झालेच कीं अकरा ! अर्ध्या तासांत स्टेशनवर जाऊन परीक्षेचा मंडप गांठला पाहिजे ( जातो. )

---

## प्रवेश २ रा

स्थळः—माजघर. माईसाहेब व कमळा

**माईसाहेब** : वाहवा ग वाहवा ! कुणी म्हणेल मी अगदीं हिचा जीव घ्यायलाच उठलें आहें. काय ग, इतकं आरडाओरडायला न् कळवळायला ग काय झालं ? बघा, काय रीत आहे ती ! कांहीं चुकलंसवरलं, तर दटावायची देखील कांहीं सोय राहिली नाहीं कुणाला ! अग पण कारटे, नीट मुलाला घ्यायला देखील येत नाहीं का ? भाजी होत आहे भाजी कीं त्याची ! आण–आण त्याला इकडं ! चुरमडलास त्याला. कळवळला कीं ग जीव त्याचा ! अवदसा जन्माला आली आहे जशी ! बघतेस काय तोंडाकडे अशी मारक्या म्हशीसारखी! दे त्याला. अन् पुन्हां त्याला कधीं हात लावशील तर पहा मग ! हिरवीपिवळी करीन–सांगून ठेवतें. माणसानं बोलूं नये–बोलूं नये म्हटलं तर बोलूं नये तरी कुठवर ! बोलायचं नाहीं, दटावायचं नाहीं,–पांच बोटं लावायचीं नाहींत–हो ! आम्हीं पडलों किती झालं तरी सावत्र आया ! एवढंसं कांहीं करा कीं झाला पराचा कावळा ! मेलं मागल्या जन्मीं कसलं पाप झालं होतं, तें या जन्मीं या कारट्यांच्या रूपानं–आमच्या पुढें आम्हांला छळायला येऊन उभं राहिलं आहे.

ही कारटी ही असली ! अन् तो कारटा तो तसला ! मघाशीं नमस्कार करून गेला, तो तरी किती ऐटींत ! मला नमस्कार करावयाचा म्हणजे दहापांच मणांचं ओझंच पडतं आहे डोक्यावर जसं कांहीं ! मला कुठं आहे तेवढा हा ! मी काय सुजून बसलें आहे जशी त्याच्या नमस्कारासाठीं ! सावत्र आयांचा जन्मच खोटा ! काय ग, तुला आज शाळेंत जायचं नाहीं वाटतं ! बोलतां येत नाहीं का ? जायचं ना शाळेंत ?

**कमला** : हो जायचं आहे !

**माई** : मग कां गेली नाहींस ? बारा वाजून गेले ना ?

**कमला** : [ अडखळत ] बाबूला घेतलं होतं.

**माई** : हें असंच घेतलं होतंस ना ! ओरडून ओरडून त्याचा प्राण कासावीस झाला, तरी त्याला समजवितां येईना, असंच घेतलं होतंस ना ? कळकळच कीं नाहीं तितकी ! बाबूला घेतलं होतं म्हणे ! ठेवून जायचं होतंस. तुम्हांला कोण विचारणार होतं ? निमित्ताला टेकलेलीं माणसं तुम्हीं. बाबूला घेतलं होतं म्हणे— उजाडल्यापासून ठिकाणा होता का तुझा ? बसली होतीस कीं बुकांत डाकं खुपसून. शाळिग्रामाला बोलवायला पाठविलं, तर आपल्या भावाच्या खोलींत हितगुज करायला गेली होतीस. शिणली असशील कीं नाहीं बाबूला घेऊन. कसलं ग एवढं भावाबरोबर हितगुज चाललं होतं आज ? कुठलं राज्य जिंकायचा मनसुबा करीत होतां ? [ केशवमामा प्रवेश करतो.] कां रे, परत कां आलास ? गाडी चुकली वाटतं ? उन्हाचा उगीचच त्रास झाला म्हणायचा ! घामानं डबडबला आहेस अगदीं. सायकलवरूनच आलास का ?

**केशव०** : सायकलवरूनच आलों. सायकल परत आणण्यासाठीं उत्तमाला स्टेशनवर बोलावलं होतं—आला तो ! पण माझी गाडीच चुकली. मग त्याला तसंच जायला सांगितलं. त्याला सायकल देऊन मी कसा चालत येऊं ? काय ऊन लागतंय् बाहेर—हुश्श ! [ कमळीकडे पाहून ] कां ? हिला कां कैद्याच्या पिंजऱ्यांत कैदी उभा करतात तशी केली आहेस ?

**माई** : कैद्यासारखी का मीं तिला उभी केली आहे ?

**केशव०**: मग कां अशी उभी राहिली आहे ही ? तुझ्यापुढं आली कीं अशीच असते.

**माई** : आतां मला रे काय माहीत ? मी का वाघीण आहें कीं काय ? पण अशी गरिबासारखी दिसते म्हणून ती गरीबच आहे, असं समजतोस का काय तिला ? नाहीं रे बाबा ! गोगलगाय अन् पोटांत पाय !

**केशव०** : जाऊं दे तें-शाळेंत नाहीं गेली ही ?

**माई** : ( हंसून ) ही-ही कोण ? अरे पुरतं तिचं तुझं लगीन तरी लागूं दे ! मग कर ती न् ही ! ( कमळी जाऊं लागते तिला ) निघालीस कुठं ? इतक्यांत इतकं नको कांहीं लाजायला ! निघालीस कुठं ?

**कमला** : शाळेंत जायचं आहे—

**केशव०** : ताई, मला थोडी कॉफी करून दिली असतीस म्हणजे—

**माई** : तुला हवी आहे कॉफी आणि ही निघाली आहे शाळेंत ! ही नवऱ्याची काळजी ! नुसतं लाजलं म्हणजे झालं ! आतांपासून असं, तर पुढं काय करशील ?

**केशव०** : मग तूं असली कसली बायको करून देणार मला ? तिचं राहूं दे ! तुझ्या पोटांत दुखत होतं तें राहिलं का ? तूंच कॉफी करून दे.

**माई** : अन् ही काय करील ? तिला जाऊं दे शाळेंत ? माझ्या मांडीवर निजलाय् बाबू मी इथून हाललें तर उठेल. तुला आज शाळेंत गेलंच पाहिजे का ? तुझं कांहीं खोळंबायचं नसेल तर रहा-जा कॉफीला आधण ठेव, जा बघूं ! आणि नसलं तुझं लक्ष घरांत लागत तर जा-हो ! तुझं आणखीं हें नको. ( कमळी जात नाहीं. ) ही का तुला कॉफी करून देणार आहे ? हिनं केल्यावर आणखीं काय हवं होतं ? अलीकडच्या मुली या अशाच असायच्या-नुसतं शाळेंत जाऊन पुस्तकं वाचायला आलीं न् झकपक् पोशाख करून मुलींतून हिंडायला मिळालं कीं झालं ! पण बोलायचं कुणी ? नाहीं शाळेंत पाठवूं तर लोक म्हणायचे ' बघा, हीच मुलीची आई असती तर मुलगी शाळेंत जायची राहिली असती का ? ' सकाळीं माझ्या पोटांत दुखत होतं-तर साबूदाण्याची लापशी करून द्यायची मनांत आलं नाहीं हिच्या ! मीं जेव्हां आपल्या प्रेमाबाईकडे निरोप पाठविला, तेव्हां तिनं आणलं थोडं कांहींसं करून ? तिकडे न् तुला जेवायला जायचं होतं-मेली जेवली कीं नाहीं कोण जाणें ! काय ग जेवलीस का ?

**कमला** : ( खालीं मान घालून ) नाहीं !

**माई** : नाहीं ? आणि उत्तम ?

**कमला** : तोहि नाहीं !

**माई** : तो देखील नाहीं ? उपाशीच गेला का ?

**कमला** : हो !

**माई** : हो ? हो म्हणून सांगायला लाज नाहीं वाटत आणखीं ? बायकोच्या जन्माला आली आहेस कीं जनावराच्या ? आपली स्पष्ट निलाजरेपणानं 'हो' म्हणतेस. माझ्या एक पोटांत दुखत होतं, पण तुझं तरी कांहीं दुखत नव्हतं ना ? आपल्या भावाला पाठविलंस उपाशी–आणखीं तूंही शाळेंत निघालीस उपाशीच ! तो पुरुष आहे, पण तुझं तुला तरी करून खायला हरकत नव्हती ? जी आपल्या भावाला उपाशी ठेवते–जी स्वतः उपाशी राहते–ती नवऱ्याला काय विचारणार आहे ? केशवा, तुला बायको करून द्यावी म्हटलं खरं, पण ही कशी काय बाबा तुझा संसार साजरा करणार आहे देवाला ठाऊक !

**केशव०** : लग्न झाल्यावर सर्व खटलं ताळयावर येईल; त्याची नको तुला काळजी. भावाला पाठविला उपाशी—

**माई** : तरीच बरं का मघाशीं नमस्कार करून जायच्या वळेला एवढा घुस्सा आला होता ! उपाशीं गेला, पण बोलला नाहीं एका शब्दानं–तशीच घाई झाली होती तर एखादा लाडू दिला नसता का मीं ?

**कमला** : [ स्वगत ] आईपणा असा गाजवायचा नाहीं तर कसा ? चुकी दादाची आणि माझीच काय ती !

**केशव०** : पण उपाशी गेला त्यांत बिघडलं काय ? उपाशी पोटीं गेला आहे तेंच बरं आहे. परीक्षा देतांना जर मन कुचराई करायला लागलं, तर उपाशी पोट त्याला सांगेल, कुचराई झाली, तर जन्मभर असं उपाशी मरावं लागेल–तेव्हां कुचराई करूं नको. उपाशी पोट असतांनाही कामाला लागण्यांत धैर्य दाखविण्याची वेळ अशा रीतीनं आम्हां हिंदुत–ब्राह्मणांत आली, हें मी देशाचं भाग्यच समजतों. कारण ब्राह्मणांनीं भोजनाच्या बाबतींत गुरफटून आमचा देश बुडविला आहे. नाहीं जेवला तर नाहीं, त्याचं तूं तरी इतकं जिवाला लावून कां घेतेस ? या बोलण्याच्या नादांत कॉफी करून द्यायचं तूं विसरणार वाटतं ? त्यांतून तूं माझ्या गळ्यांत असली बायको बांधते आहेस ? काय ग कमळे, आपलं लग्न लागल्यावर तूं असंच करणार का ?

**माई** : एवढंच करून राहिली तरी नशीब समज तुझं ! अरे, ती आतां सगळ्या परीक्षा देणार. मोठी थोरली हापिसरीण होईल–ती जाईल नोकरीवर आणि तुला सांगेल तुझा अन् तिचा सैंपाक करून ठेवायला—

**केशव०** : तेवढी गोष्ट मात्र बोलूं नकोस ! तिला नौकरी करूं देईन–तेवढाच

वरखर्चाला माझ्या हातीं पैसा खेळेल. पण सैंपाक मात्र हिनेंच करून घातला पाहिजे.

**माई** : अरे पण तिला सैंपाक करतां येईल तेव्हां ना तुला ती करून घालणार? सैंपाक करून तिनं हपीसला केव्हां जायचं? हं, बाबूला घेऊन जा, नीट निजीव पाळण्यांत नेऊन–येईल का निजवायला नीट?–काम सांगूं नये म्हटलं तर मेलं हातनं होत नाहीं! जा, आणखीं केशवाला कॉफी करून दे, नी तूंहि कांहीं करून खा. आज नाहीं शाळेंत गेलीस तरी चालेल. तो एकटा उपाशी गेला, जाऊं दे–कुणीकडून तरी सावत्र आईचा उणेपणा होईल तेवढा पाहून जगांत डांगोरा पिटायचा, एवढंच तुम्हांला समजतं. पण सगळंच ध्यानांत घेऊन आमचं चालायला पाहिजे ना? तरी बरं मी आपलं होईल तेवढं पाठीवर टाकतें. तिकडून वरचेवर सांगायचं होतं कीं 'पहा बरं, लोकांत वाईट दिसेल असं कांहीं करूं नका!' पण यांनीं तर आमचा उणेपणा जगापुढं मांडायचा चंग बांधला आहे जसा कांहीं!

**केशव०**: तें आतां तुझ्या जन्मालाच लागलं आहे. [ कमळा मुलाला घेऊन जाते ] बाकी ताई, तूं कमीला फारच बोलतेस बघ, आणखीं आज मारलंसहि वाटतं?

**माई** : इतक्यांत इतकी कळकळ वाटायला लागली का? उत्तम उपाशी गेला तर तें तुला खपतं आणि कमलेला बोललेलं कांहीं तुला बरं वाटतं नाहीं? वा रे वा! काय सांगूं तुला? या कारट्यांना समोर पाहिलं कीं त्यांना खाऊं का गिळूं असं होऊन जातं मला! माझ्यापुढं मेलीं तोरा मिरवतात. ह्या कारटीचं असो एक मेलं! ती तुझा संसार उभा करील. पण माझ्या डोळ्यांत तो कारटा सारखा सलतो आहे. सवतीचं कारटं, त्यांतून, माझ्या बाबूचा दायाद—

**केशव०** : ताई, ताई फारच वाहावत चाललीस तूं! सर्व गोष्टी खऱ्या असल्या तरी वायफळ बोलून काय करायचं?

**माई** : या कारट्यांची कल्पनाच कपाळाची शीर उठवते. त्यांतून आज–

**केशव०** : आजच तुला इतकं संतापायला काय झालं?

**माई** : आज त्या कारट्याची परीक्षा आहे ना? त्याला साऱ्या शहरांत चांगला चांगला म्हणतात! त्याची वाखाणणी करतात! उद्यां तो परीक्षेंत उतरेल! सवतीच्या कारट्याचं बरं झालेलं मला कसें बघवेल? माझ्या बाबूचा भागीदार–अर्ध्या वांटणीचा हिस्सेदार-त्याला काय म्हणून अर्धी वांटणी द्यायची?

**केशव०** : पण त्याला तूं काय करणार ?

**माई** : काय करूं तेंच सुचेना, म्हणून माझा मलाच संताप आला आहे. कारटं एखाद्या रोगानं आजारी पडून-माझ्या हातीं जर असतं तर—

**केशव०** : मग तुझ्या हातीं नाहीं कीं काय ? एकाद्या दिवशीं जेवणांत—

**माई** : वीषसुद्धां घातलं असतं रे ! पण लोकापवाद आहे ना ? वीष घातल्याचं उघडकीला यायचं नाहीं का ? अरे, दुसऱ्यांनीं केलं तरी तें माझ्यावरच यायचं ! मग तें मीं कसं करूं ? नाहीं तर तेंही मीं केलं असतं. तसं करतां येईना, अन् माझ्या मनासारखं होईना ! जगांत काय कॉलरा, प्लेग, इन्फ्लुएन्झा, थोडे का रोग पसरले आहेत. पण हा कारटा त्यांना कसा सांपडेना ? आम्हां बायकांच्या मनांत असतं पुष्कळ, पण साऱ्याच गोष्टी कुठं मनासारख्या होतात ? म्हणून तर मनांतल्या मनांत कुढायचं, संतापायचं, अन् छळायचं !

**केशव०** : पण नुसतं छळून काय होणार ?

**माई०** : मग काय करूं तर ? तुझी कांहीं मदत होईल, म्हणून कांहीं तरी निमित्त करून तिकडे हट्ट धरून बसलें, अन् तुला आणवलं ! पण तुझं घरांत कांहींच लक्ष नाहीं. तूं आपला आज मुंबई, उद्यां मद्रास तर परवां कलकत्ता करण्याच्या पाठीं लागला आहेस. म्हटलं तूं कांहीं युक्ति काढशील. त्या कारट्याचं बरं झालेलं मला बघवणार नाहीं—

**केशव०** : अग कुणी ऐकेल ? पण मी काय करूं ? मला करतां येण्यासारखें असतं त्यांत मी कधीं अंगचोरपणा करतों का ? तूं सांगितलंस तर त्याला दोन वेळां घरांतून पळवून लावलं—

**माई** : पण तें कायमचं कुठं झालं ?

**केशव०** : अण्णासाहेबांनीं दहा रुपयांचें बक्षीस लावून वर्तमानपत्रांत ‘ नोटीस ’ दिली अन् त्याला आणवला, त्याला मी काय करूं ?

**माई** : म्हणून म्हणतें कीं त्याचा कायमचा कांहीं तरी बंदोबस्त नको का व्हायला ?

**केशव०** : मी त्याच विचारांत आहें.

**माई** : पण कायरे, तुमच्या कागदपत्रांतून नसतं का कांहीं करतां येण्यासारखं ?

**केशव०** : त्याचाच मी विचार करतों आहें. तसं कांहीं करतां येईल.

**माई** : मग तें कर ! कुणीकडून तरी त्या कारट्याचं—

**केशव** : तसं करायला प्रथम अण्णासाहेबांच्या मनांतून तो पूर्णपणें उतरला

पाहिजे! बाकी घरांतून पळून गेल्यापासूनच त्यांच्या मनांतून उत्तम उतरायला सुरवात झाली आहे, तो पूर्णपणें उतरायला पाहिजे. आणखीं—

**माई** : आणखीं काय? तिकडच्या मनांतून पुरेतपणीं उतरण्याची खटपट मी करतें; आणखीं काय?

**केशव** : व्यसनी, बदमाष, वेडा असा झाला पाहिजे, आणि तसा खराखुरा झाला नाहीं तरी, प्रसंगीं पडल्यास सरकारदरबारीं तसा तो आहे, असें सिद्ध करून दाखवितां आलं पाहिजे!—

**माई** : मग त्याला काय हरकत आहे?

**केशव** : अग ताई, त्याला सारं शहर चागलं म्हणतं, हुशार समजतं; आणि खरं पाहूं गेलं तर तो आहेहि हुशार! त्याला बदमाष, वेडा कोण म्हणणार?

**माई** : पण त्याला, तुला व्यसन लावतां येईल.

**केशव** : हो—

**माई** : व्यसनी झाल्यावर बदमाष व्हायला आणि वेडा करायला किती उशीर लागेल? केशवा, करच एवढं! त्याशिवाय माझं मन शांत होणार नाहीं! त्याला व्यसनाला लाव. पण तो व्यसनी व वेडा झाल्यावर काय होईल?

**केशव** : काय होईल म्हणजे? अग, मग अण्णासाहेब आपलं मृत्युपत्र ( माई दचकते ) करतील, त्यांत उत्तमाचा वारसा अजीबात उडवितील!

**माई** : मग तर करच एवढं! त्याला काय वाटेल तें करून व्यसनी कर; आणि याच वेळेला त्याला व्यसन लावायला संधि चांगली आहे.

**केशव** : संधि आहे खरी! आतां तो परीक्षा उतरेल नी सर्व गांव त्याला डोक्यावर घेऊन नाचायला लागेल; तो जाईल फुशारून! अशा वेळीं आपण जर त्याला व्यसनाची वाट दाखविली तर—

**माई** : अगदीं आपल्या मनासारखं होईल. तूं काय वाटेल तें कर. पण केशव, हें काम तुलाच करायला हवं. माझ्या मनासारखं कर मी तुझ्या तोंडांत तोंडभर साखर घालीन! त्याला व्यसन लागूं दे, तो बदमाष होऊं दे. त्याला वेडा कर. काय वाटेल तें होऊं दे. तो मेला नाहीं तरी त्याच्या जिवंत जन्माचा सत्यानाश होऊं दे. पण माझ्या बाबूच्या सुखांतला कांटा काढून टाक—

**केशव** : मीं त्या प्रयत्नाला लागण्याचा विचार केलाच होता पूर्वीपासून आणि आतां मी तें लौकरच करणार आहें. पण तूंहि हलकेंहलकें अण्णासाहेबांच्या पाठीशीं एक टुमणं लाव.

**माई** : तें कसलं ?

**केशव** : त्यांच्या मागं टुमणं लावायचं कीं, तुमच्या जिवांत जीव आहे तोंपर्यंत उत्तमचं अन् बाबूचं नीट करून टाका; उत्तमानं माझ्या बाबूला पुढं पाठीमागं त्रास द्यायला नको.

**माई** : हें का मी केल्याशिवाय राहीन ? तूं सांगायच्या आधींच माझा तगादा तिकडच्या पाठीशीं मीं करायला सुरवात केली आहे. आणखी त्या कारट्याला व्यसन लावायचा उद्योग तूं करीत असतांना त्याच्याबरोबर तुला एखादं व्यसन लागलं तरी हरकत नाहीं. मला कांहीं कमी नाहीं. मी तुझं व्यसन चालवीन. उत्तमाला वेड लावण्याकरतां, देवदेवर्षि, अंगारेधुपारे देखील करीन म्हणतें मी !

**केशव** : काय करायचें असेल तें तूं खुशाल कर. पण चल, मी आतां एक्सप्रेस-लाच मुंबई जातों. कॉफीबरोबर मला थोडं फराळाचंहि दे. मुंबईहून येतांच मी लागतों त्या उद्योगाला. हो, मी म्हणत होतों कीं, मला बरोबर शंभर रुपयेच कसे पुरणार ? आणखीं एक शंभरभर असते तर मी तें–हें आणणार होतों—

**माई** : मग काल त्याच वेळेला कां नाहीं मागितलेस ? तूं पुरे म्हणालास—

**केशव** : आतां दे, चल. पण ताई, तुला सांगून ठेवतों, कमीला फारसा त्रास देऊं नकोस अं !

**माई** : [ हंसत ] बरं–बरं, आधीं तिनं केलेली कॉफी घे चल—

( जातात. )

---

## प्रवेश ३ रा.

[ **स्थळ** : अण्णासाहेबांचे घरापुढील व्हरांडा. कमला पत्र वाचीत येते. ]

**कमला** : ( पत्र उलथें पालथें करून ) मामाचं पत्र हें. येतो आहे मामा. केव्हां बरं येणार आहे ? ( पत्रावरची तारीख पाहून ) तारीख वीस. पांचच्या गाडीनं–म्हणजे उद्यांच ! मामा पुण्याला किती दिवसांनीं पण येतो आहे ! आई वारल्यापासून मामा कांहीं पुण्याला आलेला नाहीं. मामा येणार, हें कळतांच मला किती आनंद झाला आहे ! दादाला देखील माझ्या सारखाच भारी आनंद होईल. मामाला आमची आठवण झाली म्हणायची ! परगांवीं गेलेली आई परत भेटायची म्हणून कळल्यावर जसा आनंद व्हावा, तसाच आनंद, मावशी किंवा

मामा भेटणार म्हणूनहि होतो! बरं झालं मामा येणार तो! चार दिवस आम्हांला तितकंच बरं वाटेल! मामाच्या सहवासांत, माईसाहेबांच्या गरमपणाला थोडीशी तरी नरमाई येईल. मामांनीं परत जातांना मागच्या सारखं-आई वारली त्या वेळेला नेलं तसं, आणखीं या खेपेला चार दिवस आपल्या खेड्याला—आमच्या त्या रम्य आजोळाला नेलं तर किती बरं होईल! मला न्याच म्हणून मी मामाला सांगेन. अहाहा! मामाच्या आनंदांत दंग झालें आणि दिवसाचा सारा त्रास, माईसाहेबांनीं हातावर मारलेल्या काठीचा ठणकाहि विसरून गेलें. मला अन् दादाला दिवसाचं उपाशी रहावं लागलं, तेंसुद्धां माझ्या ध्यानांत आलं नाहीं. दादा अजून कांहीं परत आला नाहीं; पांच वाजायला आले आहेत. इतक्यांत येईल वाटतं. मी जेवलें, पण दादा नाहीं जेवला अजून. दादाच्या अगोदर मी कां बरं जेवलें? किती मी निष्ठुर- आहें! दादा उपाशी अन् मीं जेवलें! पण मी सुखानं का जेवलें? जेवलें नाहीं तर माईसाहेबांचा आणखी प्रसाद मिळेल, या भीतीनं चार घांस खाल्ले. पण दादा जेवला नाहीं—तो उपाशी आहे—( पाहून ) आलाच दादा! ( उत्तम येतो ) आलास दादा? फारच थकला आहेस. मी तुझी वाटच पहात होतें. चल. अगोदर जेवायला चल. मी जेवलें, तूं उपाशी आहेस.

**उत्तम :** नाहीं ताई, मी उपाशी नाहीं. तूं जेवलीस ना? बरं झालं. तूं जेवलीस ना?

**कमला :** मी जेवलें. पण तूं कुठं जेवलास?

**उत्तम :** जेवलों नाहीं, पण फराळ केला.

**कमला :** कुठं? केव्हांशीं पण?

**उत्तम :** परीक्षेच्या मधल्या सुट्टींत. मी उपाशी होतों हें आपल्या शाळिग्रामला माहीत होतं ना? तो म्हातारा का स्वस्थ बसणार आहे? मधल्या सुट्टींत मी जों बाहेर येतों आहें, तों शाळिग्राम हातांत फराळाचा डबा घेऊन माझी वाट पहात उभा! मला पाहतांच अगोदर हें खा, मग काय बोलायचं तें बोला असें म्हणाला!

**कमला :** ( डोळ्यांत पाणी आणून ) शाबास शाळिग्राम! दादा, शाळिग्रामा-सारख्या घरांतल्या नोकरानें आपली इतकी काळजी वाहावी, अन् घरांतल्या माणसांनीं—

**उत्तम** : जगाचाच हा न्याय आहे ! त्यांत काय आहे विशेष ?–बाकी शाळिग्राम म्हणजे एक रत्न आहे आपल्या घरांत ! आमच्यासाठीं रात्रंदिवस अगदीं आंतल्याआंत तळमळत असतो—

**कमला** : आणखी आईची आठवण निघाली कीं, त्याच्या डोळ्याला पाणी येतं. कित्येकदां तर एकटाच असतांना आपल्या आईच्या तसबिरीपुढं बसून, जवळपास कोणी नसलं म्हणजे घटकाच्या घटका रडत असतो.

**उत्तम** : पूर्व जन्मींचा लागाबांधा आहे झालं ! यानं आमची बाजू घेतली, म्हणजे अण्णासाहेब सुद्धां गप्प बसतात !

**कमला** : असूं दे तें ! मी काय म्हणत होतें ! हं, आजचे पेपर कसे गेले आहेत ?

**उत्तम** : फारच चांगले गेले आहेत ! परीक्षेची आतां नाहीं काळजी !

**कमला** : चांगलं झालं ! आजच्यासारखेच सगळे पेपर गेले म्हणजे मिळवली. बरं, तुझ्या स्नेह्याचे ?

**उत्तम** : कुणाचे ? भय्यासाहेबाचे का ? त्यानेंहि चांगले लिहिले आहेत ! वा ! ताईसाहेब, भावी वराची आतांपासूनच का इतकी काळजी ? छान्–छान् !—

**कमला** : ( लाजून हसते ) हें रे काय दादा ? मीं तसं म्हणून कां विचारलं ?

**उत्तम** : भय्यासाहेबाशीं तुझं लग्न व्हायला किती अडचणींचे पर्वत मध्यें आहेत, माहीत आहे का तुला ?

**कमला** : दुसऱ्यातिसऱ्या अडचणी लक्षांत घ्यायचं कारण आज नसलं, तरी एक अडचण आजच मूर्तिमंत माझ्यापुढं माईसाहेबांनीं मांडली आहे !

**उत्तम** : ती कोणती आणखीं ?

**कमला** : माईसाहेब माझं लगीन लावून देणार आहेत—

**उत्तम** : कोणाबरोबर ?

**कमला** : त्यांच्या भावाबरोबर ! केशव–कठोरमामाबरोबर !

**उत्तम** : अरे वा ! ही योजना आहे का माईसाहेबांची ?

**कमला** : आजचीच नाहीं कांहीं ! आहे पुष्कळ दिवसांची ! आज फक्त त्याची साधी तालीम झाली ! केशवमामाहि अगदीं उत्कंठित झाला आहे !

**उत्तम** : घे म्हणावं गुडघ्याला बाशिंग बांधून !

**कमला** : ( उद्विग्नतेनें ) असंच कसं म्हणतां येईल ? माईसाहेबांचा निश्चय–

**उत्तम** : ब्रह्मदेवाच्या निश्चयापुढं त्याची मातब्बरी नाहीं ! भय्यासाहेबाशीं तुझा विवाह व्हायचा नसला तरी केशवमामाकरितां तरी तुला ब्रह्मदेवानं जन्माला

घातली नाहीं खास. माईसाहेबांचा निश्चय! माईसाहेबांचा निश्चय, तुझ्या माझ्या सध्यांच्या दुबळ्या निश्चयाला पंगु करील, पण ईश्वरी निश्चयाला पांगळें करण्याचं सामर्थ्य त्याच्यांत नाहीं! मी उपाशी गेल्याची माईसाहेबांनीं चौकशी तरी केली काग?–

**कमला** : होय. आणखीं तूं उपाशी गेलास म्हणून तुझी–माझी आज रात्रीं अण्णासाहेबांच्याकडून माईसाहेब यथास्थित पूजा पण करविणार आहेत!

**उत्तम** : रोजचंच आहे तें! केशवमामा एक्स्प्रेसला गेले वाटतं मग? मला उगाच स्टेशनवर हेलपाटा दिला.

**कमला** : एक्स्प्रेसलाच गेले. पण हो, दादा, तुला एक आनंदाची बातमी मी सांगणार आहें! काय असेल ओळख पाहूं?

**उत्तम** : मी काय ओळखूं? काय आहे बातमी?

**कमला** : आपला मामा येणार आहे!

**उत्तम** : कोण? अमृतमामा? कशावरून?–( आश्चर्यानें पाहतो. )

**कमला** : हें पहा पत्र! ( पत्र देते. ) धांदलींत माझ्या हातांतलं पत्रसुद्धां दिसलं नाहीं तुला?

**उत्तम** : ( घाईनें पत्र वाचून ) उद्यां येणार मामा? छान झालं! ताई, आपला अमृतमामा अगदीं योग्य वेळेला येत आहे. याच वेळीं मामाला इकडे यायची अचुक बुद्धि कशी झाली? ताई, आतां मला पुरता धीर आला! परीक्षेचे उद्यांचे सर्व पेपर्स माझ्या कल्पनेहूनही चांगले जाणार! माझा मामा, मला सन्मार्ग दाखविणारा माझा गुरु, ऐनवेळीं माझ्याजवळ आला तर मला धीर कां येणार नाहीं? माईसाहेबांच्या त्रासाला त्रासून घर सोडून मी बहकलों, त्या वेळीं मातेच्या ममतेची साक्ष मला मामांनींच पटविली! भडकलेल्या मला मार्गी लावलं! या वेळीं पुनः मामा येतो आहे आणि तेंहि आठचार दिवस राहण्याच्या मुदतीनें; चांगलं झालं, नाहीं ताई? माईसाहेबांना अजून मामानें पाहीलेलं नाहीं. घेईल चार दिवस अनुभव माईसाहेबांच्या राज्याचा! ताई, मामा येणार म्हणून मला किती किती आनंद झाला आहे—

**कमला** : मलाहि तुझ्यासारखाच!

**उत्तम** : तुझ्याहूनहि मला फारच! माझ्या आनंदाचं कारण तुला समजणार नाहीं! ताई, आपला अमृतमामा म्हणजे आपल्या आयुष्याचा आधार आहे. ज्या ज्या वेळीं माझ्या हातून चूक होते, त्या त्या वेळीं ती नीटपणें सुधारून

देऊन पुढचा मार्ग मला मामाच दाखवितो. अण्णासाहेबांना ऑफिसच्या गर्दीत एका ऑफिसाशिवाय दुसरं कांहीं एक करतां येत नाहीं; तेव्हां त्यांच्या शिरावरची ही जबाबदारी आपली आई वारली तेव्हांपासून मामानं आपल्या शिरावर घेऊन ती योग्य प्रकारें संभाळीत आणली आहे. मीं चुकावं आणि मामानें धांवून येऊन चूक सुधारावी, असा आजपर्यंतचा अनुभव आहे. यामुळं मामा येणार हें कळतांच मला आनंद झाला. तसंच माझ्या हातून एखादी चूक झाली कीं काय? म्हणून मीं माझ्या मनाला प्रश्नहि केला! माझ्या हातून चूक तर झाली नाहीं! मग मामा कसा येतो आहे? या कल्पनेनं गोंधळलोंहि मी कांहीं वेळ! पण न जाणो, माझ्या हातून एखादी चूक होणारहि असेल. ही वेळ माझ्या आयुष्यांत अत्यंत महत्त्वाची आहे.मी माझ्या आयुष्याच्या मार्गांत सध्या अशा ठिकाणीं उभा आहें, कीं गेलों तर चांगल्या मार्गाला जाईन, नाहीं तर आयुष्याच्या अधःपाताचा मार्ग संभ्रमानं पत्करीन! आणि असं जर या क्षणीं झालं, तर मग तें आवरणं मामांनाच काय, पण कोणालाहि अतिशय कठीण जाणार आहे! तेव्हां अधःपाताचा मार्ग मला मिळूं नये, म्हणून वेळींच मामाला आणण्याचा ईश्वरी संकेत नसेल कशावरून? होय, असंच असलं पाहिजे; आणि म्हणूनच मला आनंद झाला आहे. उद्यां मामा येणार! [पडद्यांत शिपाई ‘कमलाबाई देशपांडे’ अशी हांक मारतो]

**शिपाई :** [प्रवेश करून] अहो, आज तुम्ही शाळेंत कां आलां नाहीं, म्हणून बाईनीं विचारलं आहे व हें पत्र दिलं आहे. [पत्र देऊन जातो.]

**कमला :** [पत्र वाचून झाल्यावर] बाई कांहीं रागावल्या नाहींत. दादा, उद्यां पांच वाचतां जगाचा प्रवास करून आलेल्या प्रसिद्ध पंडिता विद्यादेवी यांचं शाळेंत व्याख्यान आहे. तेव्हां मला गेलं पाहिजे.

**उत्तम :** पण तुला माईची परवानगी काढली पाहिजे.

**कमला :** बाईचं पत्र दाखविलं म्हणजे माई देतील परवानगी.

**उत्तम :** ताई, आंत जाशील तेव्हां हें अमृतमामाचं पत्र अण्णासाहेबांच्या टेबलावर ठेव बरं का? [पत्र हातांत देतो.] उद्यां पांच वाजतां काय मौज होणार माहीत आहे ताई तुला? तूं व्याख्यानाहून परत येत आहेस, मी परीक्षेच्या मंडपांतून परत येतों आहें आणि स्टेशनवरून आलेला मामा टांग्यांतून आपल्या दारापुढं उतरतो आहे. सर्वांची भेट आपल्या दरवाज्यांतच—

**कमला** : आणि माईसाहेब अंगणांतून तो देखावा पाहताहेत !

**उत्तम** : असंच व्हायचं ! जा. मीहि थोडा वेळ फिरून येतों, म्हणजे अभ्यासाला लागायला बरं. [ जातात. ]

---

## प्रवेश ४ था

[ **स्थळ** : अण्यासाहेबांच्या घरापुढील रस्ता. **पात्रें** : अमृतमामा व टांगेवाला. ]

**टांगेवाला** : [ अमृतमामांनीं दिलेले पैसे घेऊन, तोंड वाईट करून रामराम करीत ] रावसाहेब, येवढंच ? गरिबाच्या पोटाकडे पाहा रावसाहेब !

**अमृत** : आणखी काय दे ? खेडवळ बघून माझ्याकडून एक दोन आणे अगा-दरच जास्त उपटले आहेस ! जा, आतां कांहीं मिळणार नाहीं ! नाहीं तर परत जातांना पुन्हां ये, त्या वेळीं काढीन आतांची कसर !

**टांगेवाला** : पुन्हां रावसाहेब मी कशाला यायला बसलों आहें ? पुण्यांत टांगे काय थोडे आहेत ?

**अमृत** : मग त्याला मी काय करूं ? पत्र्यामारुती हाच म्हणून मला गवत्या-मारुतीजवळच सोडीत होतास, त्या वेळीं तुला अधेलीची पावली खपली नाहीं. असली गरज तर येशील !

**टांगेवाला** : बरं आहे रावसाहेब ! तुमच्यापुढं आमचं काय बोलणं असणार ? [ जातो. ]

**अमृत** : [ स्वगत ] केव्हांहि पहा—पुणें आपलं नवीन वाटतं. कालचं आज नाहीं, आजचं उद्यां नाहीं; अन् उद्यांचं परवां नाहीं ! पेशवाईतील पुणं कसं होतं, हें सांगणारीं वृद्ध माणसं आहेत, तीं त्या वेळचं वर्णन करूं लागलीं म्हणजे मनाला मौज वाटतेच; पण आजकालचं पुणं पाहातांनाहि नवीन माणसांला तितकीच मौज वाटल्याखेरीज राहात नाहीं ! लहानपणापासून पुण्याला यायचं म्हणजे —माझी ताई असतांना—इतरांप्रमाणं मलाहि आनंद होत असे. पण आज नाविन्यानं इतकं परिपूर्ण असें पुणें पुढं असतां, आणि मी अगदीं ताईच्या घरापुढं उभा असतां—माझ्या मनाला पूर्वीसारखा आनंद होत नाहीं ! कारण ? कारण ताई नाहीं म्हणून ! किती वेळ झाला मी दारांत उभा आहें त्याला ! पण आंत जाण्याची मनाला उत्सुकताच नाहीं. माझी मातेसमान ताई

होती, त्या वेळीं मी गांवाहून आल्यावर बाहेरच्या बाहेर असा कधींच एक क्षण-भरहि राहिलों नाहीं. प्रत्येक वेळीं–निराळ्याच तऱ्हेनं, ताईला मी आल्याची खूण दाखवून किती तरी वेळ लपून बसून ताईच्या दृष्टीस पडत नसें आणि ताईच्या मनाची मौज करीं ! पण आतां काय ? आतां आंतला साराच प्रकार निराळा झाला आहे ! या वेळीं अण्णासाहेब कुठले घरीं असायला ? ते ऑफिसांत आणि उत्तम शाळेमध्यें असेल. असली तर कमळी घरांत असायची. तीहि जर शाळेंत गेली असेल तर, माझ्या ताईची जागा पटकावलेल्या माईसाहेब घरीं असायच्या ! प्रवासामुळं फार कंटाळा आला आहे, नाहीं तर रात्रीपर्यंत कुणीकडून तरी फिरून आलों असतों. जाऊं या झालं घरांतच ! पाहूं या तर खरा अण्णासाहेबांच्या घरचा आतांचा रागरंग !

[ पडदा वर जातो. माई विणकाम करीत बसल्या आहेत, बाबूला जवळ निजविला आहे, असा देखावा अमृतमामांच्या दृष्टीला पडतो.

**प्रेमाबाई** : माई, जातें मी आतां. किती बरं उशीर झाला ?

**माई** : बसा हो, जाल आतां; जायचं आहेच ! येतां नि जातें जातें म्हणतां–मग येतां तरी कशाला ? तुम्ही आलांत म्हणजे चार घटका बरं असतं. बोलण्या-सवरण्यांत वेळ जातो चांगला आणि हातांतलं काम झरझर होतं बोलण्याच्या नादांत ! पाहिलंत नाहीं कां बोलण्याच्या नादांत किती काम झालं तें ? तुम्ही नाहीं आलां तर दुपारचा वेळ कसा तो जातच नाहीं ! मग आहेच या मुलाबरोबर रें रें करीत कांहीं तरी करायचं ! ( अमृत येतो. )

**प्रेमाबाई** : कोण कीं, पाहुणे आले वाटतं ? जातेंच मी–( जाते. )

**अमृत** : अण्णासाहेब इथंच असतात ना ? ( माई मानेनें 'होय' म्हणतात. ) मग कांहीं हरकत नाहीं. ( गांठोडें कोंपऱ्यांत ठेवीत ) इथं ठेवलं तर चालेल का गांठोडं ?

**माई** : कोण पाहिजे आपल्याला ?

**अमृत** : अण्णासाहेब देशपांडे इथंच राहतात ना ? मी त्यांच्याकडे आलों आहें !

**माई** : पण हपीसांत जायचं झालं आहे !

**अमृत** : तें ठाऊक आहे मला ! किती वाजतां परत येतील ?

**माई** : साडेआठ वाजतां परत यायचं होतं. उद्यां सकाळीं साडेआठांच्या आंत याल तर गांठ पडेल !

**अमृत** : म्हणजे ? मी आतां बाहेर जाऊं कीं काय ? आणि कुठं जाऊं ?

**माई** : पण उद्यांशिवाय गांठ पडायची नाहीं !

**अमृत** : रात्रीं घरीं नसतात वाटतं अण्णासाहेब ?

**माई** : मला नाहीं माहीत ! असली चौकशी कशाला पाहिजे ?

(मुलाला घेऊन घरांत जाऊं लागते.)

**अमृत** : अहो, घरांत जाऊं नका—मला सांगा—शहरचीं माणसं तुम्ही !

**माई** : रात्रीं गांठ पडायची नाहीं ! कंटाळून यायचं होतं—आपलं काय काम असेल तें उद्यां होईल. म्हणून नीट सांगितलं, उद्यां या—

**अमृत** : पण आतां कुठं जाऊं ?

**माई** : तें कोणाला विचारतां ?

**अमृत** : मी इथं राहणार आहें !

**माई** : उद्यां गांठ पडल्यावर—

**अमृत** : आणखीं तोंपर्यंत ?

**माई** : हें काय दुसऱ्याला विचारतां ? शहरांत—स्टेशनवर धर्मशाळा पुष्कळ आहेत !

**अमृत** : आतां कुठं शोधीत बसूं त्या धर्मशाळा—नवखा मनुष्य मी !

**माई** : पण तें आम्हांला सांगून काय उपयोग ?

**अमृत** : पण मी आतां येथून जातच नाहीं !

**माई** : आमच्या घरीं नाहीं बसायचं ! कांहीं रीतबीत आहे कीं नाहीं ?

**अमृत** : आम्हांला कुठली रीत खेड्याच्या माणसांना !

**माई** : दिसतंच आहे तें—सांगायला कशाला हवं ?

**अमृत** : मग झालं तर !

**माई** : पण म्हणून कांहीं इथं बसायचं नाहीं.

**अमृत** : आपण रागावलां वाटतं ?

**माई** : मेला शाळिग्रामहि नाहीं इथं !

**अमृत** : वाः ! तो म्हातारा नोकर आहे का अजून तुमच्या घरीं ? फारच सज्जन हं तो !

**माई** : काय करावं या लोचटपणाला ? दारीं आलेल्या भिकाऱ्यापेक्षां चिकटपणा चालविला आहे ! पुरुष मंडळी नाहींत घरांत—मुलेंहि शाळेंत गेलेलीं—

**अमृत** : येतील आतां (कडेवरच्या बाबूकडे पाहून) अरे वा ! अगदीं माझ्या-

कडे टक लावून पहातो आहे. ओळखतोस का रे तूं मला? गुलाम हंसायला लागला! अजून बसत नाहीं वाटतं?

**माई** : (चिडून) तुम्ही कोण म्हणून तुम्हांला ठेवून घ्यायचं?

**अमृत** : पाहुणा म्हणून!

**माई** : इश्य! पाहुणा म्हणून ठेवून घ्यायचं?

**अमृत** : पाहुणा म्हणून ठेवून घ्यायचं नसलं, तर ठेवून घेऊन पाहुणा करा! रागावूं नका! आणि रागावलांत तरी दाखऊं नका! किंवा मीच तुमच्याकडे पहात नाहीं? मला राह्यला मिळून तुमचा रागही तुम्हांला टिकवितां आला तर त्यांत काय बिघडलं?

**माई** : (स्वगत) हा बाष्कळ माणूस आहे तरी कोण बाई? कां डोकं भ्रमून गेल्यामुळं असा बोलतो आहे? (उघड) काय हो? आपलं डोकं फिरलं आहे का?

**अमृत** : अहो बाईसाहेब, 'डोकं फिरलं असतं' तर माझें तोंड पाठीकडे नसतं का झालं? रागावूं नका! थोरमोठीं माणसं तुम्ही! शहरांत राहणारीं! घरदार करून राहिलेलीं! एकादा अनोळखी आला, तर गृहस्थ धर्माला अनुसरून जागा देणें तुमचें कर्तव्य नाहीं का? संतापूं नका! पुरुष मंडळी घरीं नसली, तर बायकांनीं काय आलेल्या माणसाला बाहेर घालवायचं? नाहीं तर खेडवळा-प्रमाणं उत्तर न देतां किंवा पंचाईत न करतां मुकाट्यानं उठून घरांत जायचं? पुरुष मंडळी घरीं येईपर्यंत बायकांनीं प्रसंगाप्रमाणें नको वागायला? राग येऊं देऊं नका! पण तुम्ही फारच रागीट दिसतां बुवा! या घरच्या पाहिल्या मालकिणी तुमच्या इतक्या रागीट नव्हत्या. त्या असतांना मी येत असें नेहमीं अण्णांच्याकडे!

**माई** : होत्या त्या चांगल्या तर बरं झालं! आणा जा त्यांना जाऊन, मी रागीट आहें म्हणे! माझ्या घरांत येऊन माझ्या तोंडावर माझी निंदा! असे कोण तुम्ही?

**अमृत** : असें विचारा म्हणजे सांगतों. मी मामा आहें!

**माई** : कामापुरते मामा पुष्कळ पाहिले मी.

**अमृत** : मी कामापुरता नाहीं, खराखुराच मामा आहें!

**माई** : गांवमामा वाटतं! केशवदेखील घरांत नाहीं आज!

**अमृत** : नसेना का कुणी? मला काय इथं जन्म काढायचा आहे? आल्या-सारखा चार दिवस राहीन अन् मग जाईन.

**माई** : तें कांहीं नाहीं–तें आपलें गाठोडें घ्या आणखीं बाहेरचा रस्ता धरा बघूं ! चार दिवस राहीन म्हणे ?

**अमृत** : जागा झिजेल वाटतं ?! अहो बाईसाहेब, (रागाचा आविर्भाव आणून) दुसऱ्यालाहि राग असतो म्हटलं ! मला काय, मी कुठंही पडेन. निदान पोलीस चौकींत पडेन ! फक्त आपल्यासारख्या थोर लोकांच्या मनाची परिक्षा पाहिली ! (स्वगत) मुलंही आज अजून कशीं आलीं नाहींत कोण जाणे ! (उघड) जागा डोक्यावर घ्या आपली. ( गाठोडें घेऊन जायचा बहाणा करतो. ) आतां येवढं तरी करा, ऑफिसांतून अण्णासाहेब आले–[ पाहून ] अरे अण्णासाहेब आले !

[ अण्णासाहेब येतात. अमृत गाठोडें खालीं ठेऊन अण्णासाहेबांना नमस्कार करतो.]

**अण्णा०** : कोण ? अमृत ? आलास का ? ( माईसाहेब अण्णासाहेबांकडे पहात राहते ]

**अमृत** : आलों, आणखीं निघालोंही !

[ गाठोडें उचलतो. ]

**अण्णा०** : कां ? आणखीं कुठं ?

**अमृत** : जातों कुठं तरी ! ( माईकडे पाहून ) यांची इच्छा आहे, कीं मीं घरीं राहूं नये !

**अण्णा०** : ( माईकडे ) हा आपल्या उत्तम–कमीचा मामा, अमृत !

**माई०** ( ओशाळून ) होय का ? मला काय माहीत ?

**अमृत** : माझं पत्र मिळालं ना आपल्याला ? ( गाठोडें ठेवतो. )

**अण्णा०** : मिळालं ! पण पत्रांत मजकूर उद्यां येतों म्हणून होता !

**अमृत** : पण पत्र काल टाकलं होतं; कालचा उद्यां म्हणजे आजच !

**अण्णा०** : ( हंसून ) खरंच. ( माईना ) पत्र काल आलं, पण मी तुम्हांला सांगायलाच विसरलों !

**अमृत** : मग यांचें बरोबर आहे ! यांचं बरोबर आहे मग ! अण्णासाहेब, नाहीं तर या मला घराच्या बाहेर घालवीत होत्या अन् मीही जात होतों. बरं झालं, शाळिग्राम वेळेला नव्हता—

**अण्णा०** : ( संभावितपणानें हंसून ) त्यानं का तुला बाहेर घातलं असतं ?

( माईंकडे ) अमृतरावमामांनीं केली वाटतं आपली फजिती ? अमृत, लहान- पणाचा तुझा द्दूडपणा गेला नाहीं अजून !

**अमृत** : जित्याची खोड मेल्याशिवाय कशी जाणार ? ( माईंना ) आतां ठेवूं का गाठोडें ? बरं, झालं तें झालं ! झाल्या गोष्टीचा चहा तरी पाजा तुमच्या पुण्याचा!

**माई** : ( कृत्रिम हंसत ) खूप आहेत कीं मामा !

**अण्णा०** : चल, तोंपर्यंत आपण बोलत बसूं चार घटका ! ( माईंना ) चहा लवकर करा. फराळाचंही लवकर आटपूं द्या. दमून आला आहे हा. आणि मुलं बाहेरून आलीं म्हणजे ' अमृतमामा आला आहे ' म्हणून सांगून पाठवून द्या मुलांना तिकडे ! ( जातात. )

---

## प्रवेश ५ वा

[ **स्थळ** : अण्णासाहेबांच्या घराचें अंगण. **पात्रें** : भय्यासाहेब एकटाच येतो. ]

**भय्या०** : मीं उत्तमाच्या घरीं येतों, तो उत्तमाच्या उत्कंठेनं कीं, कमलच्या वासानं, तें माझं मलाच कळेनासं झालं आहे ! कांहीं तरी निमित्त काढावं आणि या घरीं एक तरी चक्कर टाकावी, असं मनांत येतं; आणि लगेच पाय वाट चालूं लागतात ! परिक्षेच्या पहिल्या दिवसाचा प्रकार झाला त्या वेळीं येणें नको इथं, असा निश्चय केला होता. पण काल संध्याकाळीं उत्तमानं ' आमचे अमृतमामा आले आहेत ' तूं मुद्दाम घरीं ये म्हणून सांगितलं ! माझ्याही मनाला पडत्या फळाच्या आशेचं निमित्त पाहिजेच होतं !—उत्तमाच्या मामांची ओळख होईलच पण विशुद्ध कमलेचे ते गोड शब्द ऐकायलाहि मिळतील, ही मनाची मुख्य आशा ! कमला माझ्याशीं विवाहबद्ध व्हावी, अशी माझी मनापासून इच्छा. आणि मीं माझ्या वडिलांना सांगितलं, तर माझ्या इच्छेविरुद्ध ते जाणारहि नाहींत ! पण कमलेशीं विवाह होण्यांत-तिच्या सावत्र आईसारखी दुर्लंघ्य अडचण मध्यें आहे. उत्तमाची स्थिति ध्यानांत घेतली, अन् कमलेकडे पाहिलं म्हणजे ' कमला माझी झाली, तर माझ्यासारखा भाग्यवान् मीच ' !—असं माझ्या मनाला वाटूं लागतं. पण माईसाहेबांच्या सारखी महामाया मध्यें आहे, तिला वळवितां आलं पाहिजे, हें मनांत आलं म्हणजे पुन्हां वाटतं—भलत्याच गोष्टीची मनाला अगोदरच आशा लावायला नको होती. ( थांबून ) छेः ! मनाला आशा लावा-

यची नाहीं ही कल्पनाच मनाला पटत नाहीं ! ( पुन्हां थांबून ) पण या गोष्टीचा विचार याच वेळीं कशाला ! ( विचार करीत ) अरे, मी वेड्यासारखा या आंगणांतच किती वेळ उभा आहें ? रस्त्यावरहि नाहीं, अन् घरांतहि नाहीं ! कोणीं पाहिलं तर मला मूर्खांतच काढतील ! ( आंत पाहून ) उत्तम घरांत दिसत नाहीं. कमला कोणत्या तरी कामांत गढलेली असेल. हांक मारून पाहावी, उत्तम–उत्तम देशपांडे–ए देशपांडे– ( शाळिग्राम येतो. )

**शाळिग्राम** : तो बाहेर गेला आहे.

**भय्या०** : बाहेर कुठं ?

**शाळिग्राम** : त्याचे ते मामा आले आहेत ते ? ते आज गेले—

**भय्या०** : [ मध्येंच ] अरे आले केव्हां, गेले केव्हां ? इतक्यांत कसे गेले ? गांठ पडली असती—

**शाळिग्राम** : म्हणजे ते आपल्या गांवीं नाहीं गेले ? ते गेले आळंदी–देहू करायला ! खेड्यापाड्याचीं माणसं, पुण्याला आलीं म्हणजे आळंदी–देहूला जायचीं; त्यांची रीतच असते–त्यांच्याबरोबर गेला आहे उत्तम बोलत बोलत !

**भय्या०** : मग हरकत नाहीं. मामा रहाणार आहेत ना ? त्यांची गांठ पडायला पाहिजे ! फारच चांगला माणूस आहे म्हणतात.

**शाळिग्राम** : चांगला म्हणजे ? अहो लाख माणूस आहे लाख ! थोरांत थोर, पोरांत पोर, गमत्या तर भारीच ! तुम्ही जरूर त्यांना भेटा. आमच्यावर त्यांचा भारी लोभ. माणूसच तसा उमदा. नाहीं तर आहेतच नवीन राज्यांतले कारभारी केशवमामा ! आपल्याच तोऱ्यांत !

**भय्या०** : ( स्वगत ) कमलेची चौकशी करणं चमत्कारिक दिसतं. या म्हाताऱ्याला कांहीं वाटायचं नाहीं; पण माझं मलाच तें चमत्कारिक वाटतं. ( उघड ) हो, केशवमामा आले का मुंबईहून ?

**शाळिग्राम** : आले की आतांच ! आला–जेवला–अन् पडला उताणा ! कांहीं आहे काळजी ? बरं, उत्तमाला सांगतों परत आल्यावर, आपण आलां होतांत म्हणून.

**भय्या०** : मुद्दाम सांग. अमृतमामा उद्यां परवां परत येतील ना ? मी येईन पुन्हां !— ( दोघे जातात. )

---

## प्रवेश ६ वा

[ **स्थळ :** अण्णासाहेबांचा बसावयाचा दिवाणखाना. एका कोपऱ्यांत बसावयाची गादी. पुढें पानतंबाकूचें तबक. दुसऱ्या कोपऱ्यांत एक मोठें टेबल, दोन खुर्च्या. टेबलावर शेल्फ्, त्यांत पुस्तकें. टेबलावर एक भारी किंमतीचा दिवा. **पात्रें:—माईसाहेब** उभी आणि **केशवमामा** टेबलाच्या ड्रॉवरजवळ धडपड करतो आहे, असा **पडदा उघडतो.**

**माई :** मृत्युपत्राची नक्कल करणं झालंय् म्हणतोस ?

**केशव :** अग हो, निदान मला तसा संशय आहे. मी मुंबईहून परत आलों, त्या दिवशीं रात्रीं अण्णासाहेब कांहीं जुने खासगी कागदपत्र काढून चाळीत होते आणि दुसऱ्या एका कोऱ्या कागदावर पेन्सिलीनं मधूनमधून लिहीत होते. म्हणून मला संशय आहे. ( ड्रॉवर उघडण्याचा प्रयत्न करीत ) याच ड्रॉवरमध्यें ते कागद ठेवतांना मीं पाहिलं होतं—तूं अण्णासाहेबांच्या पाठीशीं त्याच वेळेपासून लागलीस वाटतं ?

**माई :** हो—आणखी ' पहायला येईल ' म्हणून एकदोन वेळेला सांगणं देखील झालं होतं ! फुरसत सांपडली कीं माझा तगादा असतोच ! पण तो चमत्कारिक गृहस्थ आल्यापासून !—आतांशां काय झालं आहे—

**केशव :** इतके दिवस झाले, पण मीं ती मूर्ति कांहीं पाहिली नाहीं !

**माई :** दिसेल कधीं तरी !

**केशव :** आला आहे त्याला बरेच दिवस झाले. पण आल्यापासून फिरतच बसला आहे. मला वाटतं वेडसर असावा तो !

**माई :** वेडसर कां असेल ? दुसऱ्याला वेड लावील तो ! आला त्या दिवशीं त्यानें माझी फजिती कशी केली सांगितलं नाहीं का तुला ! दिसते मुद्रा बावळी, पण आहे कसली चमत्कारिक म्हणतोस ! असा त्याचा राग येतो मला ! चार दिवस राहणार होता म्हणे—त्याला झाले आज पंधरा दिवस ! आल्यापासून घरीं पाऊल कुठं आहे ? पण घरीं राहणारच आहे म्हणे अजून आठ दिवस ! आणखीं तो आल्यापासून त्या कारट्यांनींही माझं अवसान घ्यावचं मांडलं आहे ! मी जेवलें आहें त्यांचं बारसं म्हणा. पण तो विचित्र माणूस आहे, त्यानं थोडं दबकल्यासारखं वाटतं !

**केशव :** त्याला कशाला वचकायला पाहिजे ! असा कोण तो बागुलबोवा !

त्यानं तुझी फजिती नुसती गमतीनं केली असेल, पण आपण त्याची अशी फजिती करूं कीं, त्याला जन्माची आठवण राहील! माझी त्याची अजून मुलाखत झाली नाहीं!

**माई** : बाकी आला आहे तो एकापरीनं चांगलंच झालं आहे! त्याच्यादेखत त्या कारट्यांना छळतें.

**केशव** : त्याच्या देखत मुलं मूर्ख–उद्दाम वेडसर दिसलीं पाहिजेत! त्यानंसुद्धां तें कबूल करायला पाहिजे.–कमळी मात्र नको हो. फक्त उत्तम!

**माई** : तशीच कांहीं तरी युक्ति काढूं या! पण आतां तो कारट्यांचा मामा असतांना आपल्याला गोडच बोललं पाहिजे बरं का? गुळाचंच वीष घालायचं! निघतय् का ड्रॉवर? निघत असलं तर पाहा–कुलूप लावलं असेल. नाहीं तर उद्यां पाहूं–शनिवार आहे आज. इपिसांतून लवकर यायचं होईल–

( ड्रॉवरजवळ घडपडत असतांना धक्का लागून दिवा फुटतो. तुकडे खालीं पडतात. केशवमामा घाबरतो. )

**केशव** : आतां ग ताई काय करायचं?

**माई** : थांब–( चोहोंकडे पाहून ) तुकडे फारसे नाहीं ना झाले? नाहींत– फारसे नाहींत! केशव, आतां ते तुकडे जोडून तूं बाहेर जा.

( कानांत कांहीं सांगून घाईनें निघून जाते. केशवमामा फुटलेला दिवा जुळवीत उभा राहतो. दुसऱ्या बाजूनें शाळिग्राम येतो.

**शाळिग्राम** : ( केशवमामाला पाहून, स्वगत ) केशवमामा आहेत वाटतं! आणि त्यांच्या हातांत कांचेचा तुकडा कसला? स्वारीनं दिव्याचं दिव्य केलेलं दिसतंय्! हो–मी कशाला आलों होतों? घड्याळांत किती वाजले तें पाह्यला! किती वाजले? अरे साडे तीन झाले. मग गेलंच पाहिजे कामाला. अण्णासाहेबांची यायची वेळ झाली आहे. ( जातो. )

**केशव०** : ( दिव्याचे तुकडे जुळवून दूर उभा राहून दिव्याकडे पाहात ) वा! जसा दिवा होता तसा दिसतो आहे, तरी पण ताईची युक्ति! पुढचं काय ताई करतेच आहे. चला आतां येथून–( कान देऊन ) आला वाटतं उत्तम! पाय वाजताहेत–गेलंच पाहिजे तर मग. ( जातो. )

**उत्तम** : ( प्रवेश करून इकडे तिकडे पाहत ) काय बरं माईनीं मला इथलं आणायला सांगितलं? टेबलाच्या ड्रॉवरांत त्यांचं गुलाबाचं फूल विसरलं आहे.

अण्णासाहेबांच्या या बसायच्या खोलींत एकटं यायचं म्हटलं कीं पोटांत धस्स होतं! मनाला मोकळेपणाच वाटत नाहीं. अण्णासाहेब मोकळेपणानं वागतच नाहींत आमच्याशीं!–आणि कारण काय एकच. मी घरांतून दोनदां पळून गेलों म्हणून! माझ्या पळून जाण्यानें त्यांना कमीपणा आला, पण तितका पोंच त्या वेळेला मला कुठून असणार? पण त्या वेळेपासून अण्णासाहेबांच्या मनांत पक्की अढी पडली आहे. त्यामुळं त्यांच्याकडे पाह्यची देखील भीति वाटते! आणि त्यांच्याप्रमाणं त्यांच्या या बसायच्या खोलींत एकटं यायचं, म्हणजे मनाला भ्याल्यासारखं होतं. माझी परीक्षा झाली, पेपर उत्तम गेले, तसं त्यांनीं मला विचारलंहि! परीक्षा चांगली झाल्याचं ऐकल्यावर त्या अढीची आठवण कांहीं तरी नाहींशी होईल, म्हणून माझी कल्पना होती. आतां अमृतमामा आल्यापासून ते मनमोकळेपणा घरांत सर्वांशींच दाखवितात, पण तो दाखविलेला मोकळेपणा स्पष्ट दिसतो. आणि अशा कृत्रिम मोकळेपणाच्या दर्शनानं मनाला जास्तच दहशत बसते. माझ्या हातून काय चुकेल आणि अण्णासाहेब बोलतील, हीच मनाला धास्ती! माईसाहेब तर आगींत तेल ओतायलाच टपलेल्या? हं! जातील तेव्हां जातील हेहि दिवस! माईसाहेबांनीं खुर्षींत काम सांगितलं आहे, उशीर झाला तर मर्जी मोडायची पुन्हां

[ ड्रॉवर उघडूं लागतो, तोंच धक्का लागून जुळलेला दिवा पुन्हां पडतो. तुकडे चोहींकडे पडतात. उत्तम भीतीनें मागें सरतो. समोरून अण्णासाहेब व माई येतात. ]

**माई** : ( शांतपणानें ) काय रे उत्तम! इथं काय करीत होतास? दिवा फोडलास वाटतं? ( अण्णासाहेब उत्तमाकडे पाहातात. उत्तम भीतीनें खालीं पाहात उभा राहतो. ) कसा फुटला रे? कसा धक्का लागला? काय पाहात होतास?

**अण्णा०** : उत्तम!

**माई** : बोलूं नये मुलाला कांहीं आतां! चुकून झाला असेल अपराध–कांचेचा पदार्थ तो–धक्का लागला–फुटला, बोलूं नये त्याला. जरा थोडं जपून वागावं!

**अण्णा०** : जपून वागायला शुद्धीवर कुठं आहे तो! अगदीं बेफामपणानं वागायला लागला आहे. कांहीं इकडे तिकडे पाहतां येत नाहीं का रे? डोळे फुटले होते का? दिवा दिसला नाहीं टेबलावर? अन् दिव्याशीं काय अशी लढाई चालली होती?

**माई** : रागावूं नये म्हणतें ना ! झालेली गोष्ट परत येते आहे का ? आतां इथून पुढें सावधपणानं वागेल तो–

**अण्णा०** : उन्मत्तपणा अंगीं मुरल्यावर सावधपणानं वागायचं सुचेल कशाला ? माझा उगाच संताप करतात–

**माई** : पण त्याचा हा आजचा एकच अपराध–

**अण्णा०** : एकच कां ? हा एकच अपराध का ? तरी मी सहसा रागावत नाहीं ! याचे जाणूनबुजून केलेले अपराध गेल्या थोड्या दिवसांतले–आपण काय थोडे सांगितलेत ? तरी त्यांकडे लक्ष दिलं नाहीं ! जाऊं द्या म्हटलं–हा एकच अपराध कसा होईल ?

**माई** : जाऊं द्या म्हटलं ना ? माझ्याकरितां तरी राग आवरायचा ? उत्तम, तूं आतां लहान का आहेस ? असं कांहीं घांद्रटपणानं चुकतोस आणि बोलून घेतोस. कुठलंही काम जपून करावं !

**अण्णा०** : पण माझ्या खोलींत याचं काय काम होतं ? काय रे ? काय पाहात होतास ?

**उत्तम** : ( खालीं मान घालून ) माईनीं आपलं फूल आणायला सांगितलं होतं–

**माई** : [ हंसून ] मी सांगितलेलं फूल तूं इथं का पाहायला आलास ? इथं रे कशाला येईल माझं फूल ? मीं तुला इथं का पाहायला सांगितलं ? माझ्या खोलींतल्या आरशाच्या पेटींतलं फूल आणायला सांगितलं–पाहिलंस ? नीट ऐकलं नाहीं म्हणजे असं होतं ! हेंच जर नीट ऐकून कामाला गेला असतास तर ? मला काय माहीत असं होईल हें ? कमल जवळपास दिसली नाहीं, म्हणून सहज तुला सांगायला गेलें—

**अण्णा०** : अन् तुम्ही म्हणतां संतापूं नको ? मस्तवालपणा अंगीं भरलेला असल्याखेरीज का अशा गोष्टी होतात ? मी अलीकडे पाहातों आहें त्याला, परीक्षा झाल्यापासून तर बेमुर्वतीचं वर्तन अधिकच होत चाललं आहे–मला काय समजत नाहींत या गोष्टी ?

**माई** : सुधारील तो आपलं वर्तन–आहे क्षुल्लक गोष्टच ! त्याचं काय इतकं मनावर घ्यायचं आहे ? क्षुल्लकच आहे–

**अण्णा०** : क्षुल्लकबद्दलचा हा प्रश्न नाहीं, हा शुद्धीनं वागण्याचा प्रश्न आहे ! शुद्ध आहे कुठं त्याला ? आणि त्याला ही क्षुल्लक वाटत असली, तरी मला नाहीं ती क्षुल्लक ! अशा उतारवयांत, मुंबई ऑफिसांत मानेवर खडा ठेवून सबंध

दिवस खपावं लागतं–मिळविण्याचं ज्ञान काडीचं नाहीं–दिवा फुकट का आला असेल ? मिळवते होतील–दिवे आणतील, आणि फोडतील–त्या वेळीं नाहीं बोलायला. जाणार !–खालीं पाहून साळसूदपणाचा आव घातला कीं संपलं ! हें पोरटं पुढं पाहिलं म्हणजे मला चीडच येते. जा–माझ्यापुढं कशाला उभा राहिला आहेस ? माझ्या तोंडाला काळं फांसलं कारट्यानं—

**माई** : बोलायचं नाहीं म्हणतें ना ? इकडच्या जिवाचा आणखीं किती संताप करून घ्यायचा ? मूल आहे–चूक होतेच आहे. त्यांतून गोष्ट कांहीं मोठ्यांतली नाहीं. आपलं असतं ठीक, पण लोकांना काय ? एवढासा दिवा तो काय अन् त्याच्याकरतां बोलायचं किंती असं लोक म्हणायचे ! आधींच सावत्रपणा आला आहे माझ्या नशिबीं ! मीच बोलायला लावतें म्हणून आहे माझा बोभाटा ! म्हणून म्हणतें आपण जपून वागावं ! त्यांतून त्याच मामा आहे, त्याला वाटायचं—

**अण्णा०** : त्याला काय वाटायचं ? अन् लोक काय बोलतात ? लोकांशीं आम्हांला काय करायचं ? लोकांना कशाला पाहिजे आमच्या घरची पंचाईत ?

**माई** : अमृतमामाला वाटायचं, माझ्या बहिणीच्या मुलांना हीच बाई चैन पडूं देत नाहीं—

**अण्णा०** : जा–जा, कशाला उभा राहिला आहेस ? जा करा, काळं—

(उत्तम जाऊं लागतो. अमृतराव येतात.)

**अमृत** : (स्वगत) अण्णासाहेब रागावलेले दिसतात ! (उघड) उत्तम, तूं कुठं निघालास ? अण्णासाहेबांनीं 'काळं कर' म्हटलेलं मीं ऐकलं आणि इथं येऊन पहातों तों तूं निघालास. थांब जरा. (डायरी काढून) मला तुझ्या खाणाखुणा नीट टिपून घेऊं दे. मागें तूं दोन वेळां पळून गेलास, त्या वेळीं अण्णासाहेबांनीं तुझ्या शोधार्थ वर्तमानपत्रांत बक्षिसाच्या जाहिराती दिल्या होत्या, त्या तितक्या नीटशा खुलासेवार नव्हत्या. म्हणून तुला दोन्हीं वेळीं आणायला फार त्रास पडला. तितका त्रास या खेपेला नको पडायला–अनवाणीच जाणार ना ? (टिपून घेतो.) मागच्या दोन्ही वेळचे दहा दहा रुपये तुला शोधून आणून मीच मिळविले आहेत. या खेपेचेहि मलाच मिळाले पाहिजेत. डोक्याला तुझी गंधर्व-क्याप घालणार कां बोडकाच जाणार ! म्हणजे बोडका असून डोक्याला सबंध केस असलेला–[टिपून घेतो.] अण्णासाहेब, उत्तम पुन्हां घरांतून गेला, तर त्याच्या शोधाकरतां वर्तमानपत्रांत जी बक्षिसाची जाहिरात द्याल, त्यांत उत्तमाचं

वर्णन मीं टिपून घेतलें आहे तसेंच द्या, म्हणजे त्याचा शोध लागेल. घरून पळून गेलेल्या मुलाच्या शोधाकरतां अलीकडे वर्तमानपत्रांत ज्या जाहिराती येतात, त्या तितक्या नीट खुलासेवार नसातात. तेव्हां माईसाहेब, आमच्यासारख्यांना बक्षीस मिळवायला फार पंचाईत पडते आणि मुलाचाहि शोध लवकर लागत नाहीं. बरं, पण होती काय भानगड माईसाहेब?

**शाळिग्राम** : ( प्रवेश करून ) बाहेर आपल्याला कोणी भेटायला आले आहेत—

**माई** : उत्तमाच्या हातून हा दिवा फुटला, त्या करतां बोलणं चाललं होतं, दुसरं कांहीं नाहीं.

**शाळिग्राम** : पण हा दिवा उत्तमानं फोडलाच नाहीं. मी घड्याळांत किती वाजले तें पाह्यला आलों होतों, त्या वेळीं केशवमामा इथं होते; अन् त्यांच्या हातांत दिव्याचे फुटके तुकडे मीं पाहिले होते. मीं पाहिलं आहे हें—

**अण्णा०** : ( आश्चर्यानें ) होय का?

**माई** : होय का? आम्हांला तरी काय माहित? (स्वगत) अरे मेल्या शाळिग्रामा—

**उत्तम** : ( स्वगत ) देवा, तूं दीनांचा वाली आहेस!

**अमृत** : ( हंसत ) पाहिलंत, हें असं होतं! दिवा फोडला एकानं; फोडणारानं जुळवून ठेवण्याची करमणूक केली असेल. ती करमणूक आली उत्तमाच्या मुळावर. पाहिलंत अण्णासाहेब? असं होत असतं पहा—

**माई** : ( स्वगत ) मेल्यानं कसं पाहिलं कोण जाणे? तरी बरं मेल्यानं मला पाहिलं नाहीं.

**अमृत** : शाळिग्राम! तूं या वेळीं इथं येऊन मोठा घोटाळा केलास. माझी दहा रुपयांची प्राप्ति तूं बुडविलीस. खरा प्रकार कळला. अण्णासाहेबांचा अन् माईचा राग शांत झाला. उत्तम पळून जायचा राहिला. त्याला शोधून आणून बक्षीस मिळवायचा माझा डाव फसला. अण्णासाहेब, या शाळिग्रामानं एवढा घोटाळा केला. का उत्तम! जाणार आहेस का अजून पळून? जाणार असशील तर जा. पहा, माझं बक्षीस बुडवूं नकोस!

**अण्णा०** : ( हंसत ) बरं अमृत, पुरे झाली तुझी थट्टा! ( शाळिग्रामाला ) मला कोणी भेटायला आले आहेत नारे? चल, तिकडेच आलों.

**अमृत** : बरं आहे माईसाहेब, प्राप्त झालेल्या या आनंदाप्रीत्यर्थ आतां सगळ्यांना गरम गरम चहा द्या म्हणजे झालं! [ सर्व जातात.

---

# अंक २ रा

## प्रवेश १ ला

[ स्थळ—पुण्यांतील एक रस्ता. पात्रें—केशवमामा, एक मजूर, त्याचें एक लहान मूल व रस्त्यांतील तमासगीर. केशवमामा सायकल जोरानें चालवीत असतां मुलाला धक्का लागून तें पडतें. त्याचें तोंड फुटून रक्त निघालेलें असतें. केशवमामा तेथून निसटण्याच्या बेतांत असतां मुलाच्या बापानें त्यांना उभें केलें आहे, असा पडदा उघडतो.

**मजूर** : सोडणार नाहीं रावसाहेब असा तुम्हांला मी—

**केशव** : ( सोडवून घेण्याचा प्रयत्न करीत ) सोड–सोड. मला धरून काय करणार : तुझें पोर मध्यें आलें, त्याला मी काय करणार ? सोड—

**मजूर** : सोडून मी काय करूं ? ( डाव्या हातानें मुलाला पुढें ओढून ) पहा रावसाहेब; मुलाच्या रक्तानें लाल झालेल्या तोंडाकडे पहा–तुम्हांला कसे सोडूं तें सांगा. तुम्हां लोकांचा खेळ झाला–आमच्या प्राणाची निशाणी झाली ! काय म्हणून सोडूं तुम्हांला ? रस्त्यांतले लोक, पोलीस चौकीवर न्या तुम्हांला म्हणून सांगताहेत; पण तुम्हां थोर लोकांची अब्रू खराब करून मला गरीबाला काय करायचं आहे ? कसा सोडूं तुम्हांला तुम्हींच सांगा—

**केशव** : तुझं पोर मध्यें कां आलं ?

**मजूर** : रावसाहेब, आपण गाडीची घंटा वाजवली होती का ?

**केशव** : माझ्या गाडीला घंटाच नाहीं !

**मजूर** : आपल्या गाडीला घंटा नाहीं, हा अपराध माझ्या मुलाचाच म्हणतां ? बरं, मूल मध्यें आलं तर गाडी उभी करण्याचा तरी थोरपणा दाखवायचा होता तुम्ही !

**केशव** : माझ्या गाडीला ब्रेकची कधींच जरूरी लागत नाहीं !

**मजूर** : म्हणूनच असले पराक्रम आपल्या हातून व्हायला अडचण पडत नाहीं ! पण आमच्यासारख्यांनीं काय करावं तें सांगा ? तुम्हांला पोलीस चौकीवर न्यावं तरी पंचाईत––

**केशव** : ( रागानें ) अरे जा ! सोड मला—पोलीस चौकीची भीति दाखवितो

आहे मला ! जसा कांहीं मी पोलीस चौकीवर कधीं गेलोंच नाहीं ? आपल्या मुलाला रस्त्यानें सावधपणनें जात जा म्हणून सांगायचं राहिलं बाजूला, तो मलाच धमकावणीच्या गोष्टी सांगतो आहेस ? थांब—( खिशांतून नोटबुक व पेन्सिल काढतो. ) माझ्या कामाचा खोळंबा केलास—नांव सांग तुझें ? केस केली पाहिजे तुझ्यावर—

**मजूर** : रावसाहेब ही आपली धमकावणी वाटतं ? गरीब झाला म्हणून चगरायचं होय ! तुमच्यासारखं होऊं द्या. पाहिल्यांदा माझ्याबरोबर पोलीस चौकीवर चला, आणि मग माझ्यावर केस का काय तुम्हांला करायची असेल ती करा ! माझ्या पोराचं तोंड फुटलं आहे, तें नीट करून घेतों आपल्याकडून आणि मग तुमच्याबद्दल काय दंड द्यावा लागेल तो भरण्याचं बघतों.

( अमृतमामा प्रवेश करतो. )

**अमृत** : [ गर्दीतून पुढें येऊन ] काय आहे ? कसली गडबड आहे ? [ अमृतमामाकडे पाहून केशव खजील होतो ] कोण ? केशवराव ? तुम्ही ? आणि या भिकाऱ्यानें तुमच्या हाताला काय म्हणून धरलं आहे ? तुमच्या दानशूरपणानं रस्त्यांतले भिकारी असें रस्त्यांत देखील तुम्हांला धरून ओढूं लागले आहेत ! ( मजुरास ) काय रे भिकाऱ्या, घरीं येऊन तुला काय मागायचं तें माग. इथं काय त्यांना असा अडवतोस ? नसेल त्यांच्याजवळ कांहीं या वेळेला, एवढें नाहीं कळत तुला ! जा त्यांच्याबरोबर. त्यांना काय कमी आहे ! केशवराव, इतका सैलपणा या ज़गांत दाखवून चालत नाहीं. हे भिकारी लोक असे चावट असतात. त्यांना कुणाची काय पोझिशन असते, कांहीं कळत नाहीं ! जा रे, यांच्याबरोबर घरीं जा ! देतील कांहीं तरी तुला !

**मजूर** : तसं नाहीं रावसाहेब ! माझ्या मुलाकडे पहा. या रावसाहेबांनीं माझ्या मुलाला—

**अमृत** : मग ? मुलालाहि बरोबर घेऊन जा. त्यालाहि कांहीं तरी देतील ! केशवराव, द्या यांना घरीं गेल्यावर कपडालत्ता !

**मजूर** : लत्ता मात्र खात्रीनें देतील हे ! अहो पण रावसाहेब, माझें नीट ऐकून तरी घ्या—आम्हांला भिकारी म्हटल्याबद्दल राग नाहीं. आम्ही कांहीं त्यांच्याजवळ भिक्षा मागायला आलों नाहीं. या सायकलस्वार रावसाहेबांनीं माझ्या मुलाच्या अंगावर सायकल घालून त्याचं तोंड फोडून टाकलं आहे, म्हणून मी यांना पदराला धरून थांबिवलं आहे.

**अमृत :** यांच्या सायकलीनं तुझ्या मुलाचं तोंड फोडलं म्हणून यांच्या पदराला तूं धरलं आहेस? आणि या भर रस्त्यांत? तूं यांना कोण समजतोस? यांची सायकल तुझ्या मुलाला नुसती लागली तर मोठा लाभ झाला, असं तुला वाटायला पाहिजे. त्यांत तोंड फुटलेलं? मग तुला आणि तुझ्या मुलाला मोक्ष मिळाल्याचं श्रेय वाटायला पाहिजे.

**मजूर :** होय रावसाहेब, माझ्या पूर्वपुण्याईनं आज माझ्या मुलाचा कपाळमोक्ष थोडक्यांत व्हावयाचा चुकला खरा!–नशिबच समजतों मी!

**केशव :** ( स्वगत रागानें ) हा अमृत्या गोड गोड बोलायचं दाखवून माझ्या अंगाची कातडी सोलतो आहे!– काय करूं?

**अमृत :** ( विचार केल्यासारखें करून ) हे घे दोन रुपये ( पिशवींतून काढून देतो. ) आणि तुझ्या मुलाला दवाखान्यांत नेऊन नीट कर. पण थांब, जातांना तुझं नांव टिपून दे. भर चवाठ्यावर या थोर गृहस्थांची बेअब्रू केलीस, याकरतां यांना तुझ्यावर अब्रूनुकसानीची केस जरूर केली पाहिजे. रावसाहेब अण्णासाहेब देशपांडे यांचे हे सुप्रसिद्ध दानशूर शालक श्रीयुत केशवमामा यांच्यासारख्या बड्या गृहस्थाचा तूं अपमान केलास!

**मजूर :** ( दोन रुपये परत देतो. ) रावसाहेब, हे तुमचे दोन रुपये नकोत आणि ती कटकटहि नको! कुणीहि गरीबांचाच काळ! त्यांच्यासारखेच तुम्हीहि थोर लोक! आमच्यासारखें कशाला बोलाल? ( रुपये टाकून जाऊं लागतो )

**अमृत :** ( त्याला हांका मारून ) अरे, हे रुपये कां टाकलेस!– जातोस कीं नाहीं घेऊन? हे रुपये नेले नाहींस, तर तो अपमान समजून केशवमामांना तुझ्यावर दुसरी केस करावी लागेल. ( मजूर पैसे घेऊन जातो. ) कां केशवमामा, कशी खोड मोडली गुलामाची! बरा मी वेळेवर आलों कीं नाहीं? ( मजूर गेला असें पाहून ) खरेंच, त्या मुलाला बरंच लागलं वाटतं! तुमची सायकल थोडी उर्मट आहे! आपली कुणाच्याहि अंगावर न जुमानतां धांवते–बायकोला जसं ताब्यांत ठेवावं लागतं, तशीच सायकलीला ताब्यांत ठेवावी लागते. नाहींतर बायकोप्रमाणेंच ही सायकल केव्हां भर रस्त्यांत अशी बेअब्रू करील याचा कांहींच नेम नाहीं!–त्यांतून तुम्हांला कमळी द्यायची आहे म्हणतात–संभाळा हं, ती आहे शिकलेली–बाकी कमा अशी तुमच्या सायकलीसारखी उर्मट नाहीं म्हणा! हाडाची गरीब आहे ती!

**केशव** : ( ओशाळून ) मामासाहेब, आतां हात जोडूं का तुम्हांला ? झाली इतकी थट्टा पुरे नाहीं का झाली ?

**अमृत** : जातिवंत थट्टेखोराला एवढीशी थट्टा कशी पुरे होईल ?— कुठं बंड गार्डनवर निघालां होतांत वाटतं ? हो खरंच, तुमच्या क्लबची जंगी पार्टी आहे नाहीं का ? या तर, जातों मी आतां घरीं— ( जातो. )

**केशव** : ( स्वगत जातांना ) या अमृत्यानं माझी अब्रू वेशीला टांगली काय ? ठीक आहे. याच्या भाच्याची अब्रू मी वेशीला टांगल्याखेरीज राहणार नाहीं (जातो)

---

## प्रवेश २ रा

[ **स्थळः**—अण्णासाहेबांच्या अंगणापुढील बाग. उत्तम मुलाला घेऊन येतो. हातांत पुस्तक असतें. ]

**उत्तम** : काय करावं बाबूला ? खालीं ठेवला तर रडायला लागतो. पुस्तकाची पांच पानं वाचीन म्हटलं, तर तें कांहीं करूं देत नाहीं बाबू ! खालीं ठेवल्यावर राह्यचा नाहीं, रडायला लागला तर माईंना पसंत पडायचं नाहीं. असं काय करावं बाबू ! असा त्रास देऊं नये—ठेवूं का खालीं तुला बाबू ! राहशील का ? नाहींतर लागशील रडायला आणि माई येतील धांवत काय झालं म्हणून पाह्यला ! नको—नको—मी खालीं ठेवीत नाहीं ऑं तुला ! राहूं दे माझं वाचायचंच—मी वाचायला लागलों आणि तूं रडायला लागलास तर माईंची मर्जी मोडल—त्या म्हणतील मीं मुद्दाम चिमटे घेऊन तुला रडायला लावलं आणि तेवढ्यासाठींच तर माईंना मधूनमधून तुला माझ्याजवळ आणून देण्याची लहर लागत असते, हें मला माहीत आहे. मी अभ्यासांत गुंतलों असतांना माईंनीं कित्येकदां तरी तुला माझ्याजवळ आणून देऊन माझ्या अभ्यासांत व्यत्यय आणला आहे—तूं लागतोस रडायला, तुला काय कळतं आहे म्हणा ! ( भय्यासाहेब येतो )

**भय्या** : का ? बाबूला घेऊन अगदीं खडा पाहारा चालला आहे ? आणि तुझ्याकडे का हें काम आलं ?

**उत्तम** : मी नेहमींच घेतों कीं त्याला ! माझ्याखेरीज अलीकडे तो रहातच नाहीं—

**भय्या** : असं माई म्हणतात ना तुझ्याजवळ देतांना ! पण त्याला घेऊन उभं कशाला राह्यला पाहिजे ?

**उत्तम** : खालीं ठेवला तर राह्यचा नाहीं—

**भय्या** : माईचाच मुलगा तो! केवळ तुम्हां बहीणभावंडांना छळण्याकरितां जन्माला आलेला—

**उत्तम** : छे! असं म्हणूं नकोस! आमचा बाबू फारच चांगल्या स्वभावाचा निघणार. माझी पूर्ण खात्री आहे!

**भय्या** : असं तूं म्हणावंस–अन् मीं ऐकावं! अरे, माईचा मुलगा–तुझा सावत्र भाऊ—

**उत्तम** : होय. पण तो उत्तमच निघणार! निदान मी त्याला उत्तम बनवीन–माझा भाऊ आहे! रामचंद्रांनीं भरताचं भूषण केलं, तसं मी माझ्या बाबूला बनवीन.

**भय्या** : (हेटाळणीनें) शक्य तरी आहे का तें?

**उत्तम** : तुला अशक्य कां वाटतं! भय्यासाहेब, माझ्या प्रयत्नानं मला बाबूचा खराखुरा भाऊ होतां आलं नाहीं, तर माझ्या आयुष्यांत मी लोक–बंधु कसा होणार? (बाबू रडायला लागतो.) मला वाटतं बाबूला बरं वाटत नाहीं. नाहीं तर इतका रडायचा नाहीं.

**भय्या** : तुझ्या साऱ्याच गोष्टी चमत्कारिक आहेत. तेव्हां तुझ्याबरोबर वाद घालण्यांत अर्थ नाहीं.

**उत्तम** : पण पुढं बाबूला पाहाशील तूं आणि मग कबूल करशील—

**भय्या** : बरं, पुरे कर तुझ्या बाबूची बहाद्दरी! मी तुझ्या बाबूचं गुणवर्णन ऐकण्याकरितां आलों नाहीं?

**उत्तम** : मग कशाला आला आहेस?

**भय्या** : बाबूला देऊन ये, मग सांगतों.

**उत्तम** : माईनीं बोलावल्याशिवाय बाबूला नेऊन देतां येणार नाहीं भय्यासाहेब! बाबूला घेऊन मला ऐकायला येईल तूं काय सांगणार तें!

**भय्या** : कमा नाहीं का? तिच्याजवळ दे!

**उत्तम** : तिला कशाला त्रास? लिहीत–वाचीत बसली असेल, नाहींतर माईनीं काम सांगितलं असेल. ताईला कामांत गुंतविल्याखेरीज बाबू माझ्याकडे यायचा नाहीं, हें विसरलास तूं! पण सांगणार आहेस काय तूं?

**भय्या** : मी तुला विचारणार आहें कीं, तूं आमच्या खेडेगांवीं येशील का? मी उद्यां जायचं म्हणतों. सकाळींच तात्यासाहेबांचं पत्र आलं आहे. बरं परीक्षेची

सुट्टी आहेच. रिझल्ट लागेपर्यंत इथं राहून तरी काय करायचं? माझ्या मनांतून न्यायचं आहे तुला! कबूल करीत असलास तर मी अण्णासाहेबांना विचारीन. विचारूं का? नाहीं म्हणणार नाहींत ना मला?

**उत्तम :** माझ्याहि मनांतून तुझ्या गांवाला यायचं होतं; पण—

**भय्या :** मग पण कशाला मध्यें आलं?

**उत्तम :** पण या परीक्षेच्या सुट्टींत कांहीं प्रसिद्ध स्थळं पाहायला जायचं म्हणून ठरविलं आहे ना आपल्या शाळेच्या मास्तरांनीं? मग तूं तरी आपल्या गांवीं कसा जाणार? जायचंच नाहीं म्हटलं त्यांनीं तर मग आपण तुझ्या गांवीं जाऊं!

**भय्या :** हें मात्र अगदीं मी विसरलोंच होतों. तात्यासाहेबांचं पत्र आलं आणि सर्व गोष्टी माझ्या मनांतून नाहींशा झाल्या.

**उत्तम :** शिवाय, आमचा अमृतमामा नुकताच आला आहे, तुला माहीत नाहीं का? मामा इथं असतांना आपण घरीं नसणं योग्य नाहीं!

**भय्या :** हो, तेंहि खरंच!

**उत्तम :** आणखी मला वाटतं, आमचा अमृतमामा इथं असल्यामुळं तुझे दिवस तुला कंटाळवाणे वाटणार नाहींत!

**भय्या :** अमृतमामांच्या सहवासांत कंटाळ्याचा प्रश्नच नाहीं! तुझा अमृतमामा म्हणजे एक और माणूस आहे बुवा! परवांचं दिव्याचं प्रकरण कळलं मला! खूपच केली अमृतमामांनीं पण! माई, केशवमामा, अण्णासाहेबसुद्धां अमृतमामांच्या तडाक्यांत सांपडले ना? तुझी प्रत्यक्ष परिस्थिति अमृतमामांनीं किती लवकर अजमावली! अमृतमामा—[ पाहून ] अरे अमृतमामाच आले! या मामा—अरे, अण्णासाहेब पण आहेत त्यांच्या पाठीमागं—

[ अमृतमामा व अण्णासाहेब येतात ]

**अमृत :** माझी कल्पना पसंत पडली ना! म्हणजे बरं, मीं त्या भय्यासाहेबांना पाहिलं, उत्तमानं त्यांची थोडीशी माहिती सांगितली. त्याच वेळीं माझ्या मनांत आलं कीं, आपल्या कमळीला तें स्थळ लाभलं तर—[ पाहून ] कोण? भय्यासाहेब का? बरं झालं. उत्तम 'बाबूला आणून दे' म्हणून माईनीं हांक मारलेली ऐकायला आली नाहीं वाटतं तुला? जा, नेऊन दे. [ उत्तम जातो. ] अण्णासाहेब, या भय्यासाहेबांच्या संगतीनंच आपला उत्तम निवळला. त्याचं अस्थिर मन स्थिर झालं आणि त्याची तीव्र बुद्धि विद्याभ्यासाकडे वळली.

[ अण्णासाहेब कांहींच बोलत नाहींत. ] काय भय्यासाहेब, तुमचे परीक्षेचे पेपर कसे काय गेले आहेत बुवा ?

**भय्या :** उत्तमाइतके चांगले गेले नाहींत कांहीं ! पण उत्तमाची संगत मला खात्रीनं परीक्षेंत पास करील !

**अमृत :** वा ! आमच्या उत्तमाबद्दल भारीच अभिमान दिसतो तुम्हांला ? तुमची संगत त्याला लाभली आणि त्याची संगत तुम्हांला फलदायी झाली, याचा मोबदला तुम्हांला मिळालाच पाहिजे. अण्णासाहेब, हे इनामदार जांवई झाले तर वावगं नाहीं ना ? भय्यासाहेब, तुमचें गोत्र कोणतें हो ? (भय्यासाहेब विचारांत पडतो.) म्हणजे माझ्या मुलीला तुम्हांला द्यायचा विचार नाहीं, अण्णासाहेबांचा विचार कमळीला तुम्हांला देण्याचा आहे. गोत्र आठवत नाहीं वाटतं ! अलीकडची मंडळी तुम्ही ! संध्या करीत नाहीं, त्याचा हा परिणाम ! आमच्यासाठीं आपल्या वडिलांना एक पत्र जरूर पाठवा.

**भय्या :** [ स्वगत ] अमृतमामा आमच्या विवाहाचाच घाट घालायला लागले ?

**अमृत :** कां हो ! विचार कसला करतां ? पाठवाल ना पत्र ?

**भय्या :** हो पाठवितों–

**अण्णा :** इतक्यांत कांहीं घाई नाहीं अमृतमामा, सवडीनं पाठवितील ते पत्र. शिवाय आपल्या घरांतल्या मंडळींना तर विचारलं पाहिजे ना ? केशवमामा आहेत, घरची मंडळी आहेत. या सर्वांना विचारूं आणि मग काय तें ठरवूं ! शिवाय, घरच्या मंडळीचं म्हणणं असं आहे कीं, उत्तमाचं लग्न कमीच्या अगोदर व्हायला पाहिजे. त्यांचंहि म्हणणं बरोबर आहे. कारण सून घरांत आल्याशिवाय मुलगी जर घराच्या बाहेर गेली, तर घरांत मंडळींचा हात मोडल्यासारखा होतो. तेव्हां सर्व गोष्टी विचारानंच घेतल्या पाहिजेत. बाकी माझ्या मतानं भय्यासाहेबांनीं आपल्या घरीं पत्र टाकायला हरकत नाहीं. अमृत, तूं केलेल्या सूचना माझ्या ध्यानांत आल्या, त्याचसंबंधानं मी विचार करतों आहें. तुझ्या सूचना विचारांत घेण्यासारख्या आहेत यांत शंकाच नाहीं, पण सध्यां आपणाला करायचं आहे तें इतकंच कीं, घरच्या मंडळीच्या मतानं सर्व गोष्टी व्हायला पाहिजेत. पाहूं–सर्व हळूहळू जमेल. हो–पण माझी ऑफिसांत जाण्याची वेळ झाली आहे, बरं जातों मी. ( जातात )

**अमृत :** भय्यासाहेब, अण्णासाहेब काय म्हणाले तें ऐकलंत ना ? जरूर पत्र

पाठवा. ( उत्तम कपडे करून येतो. ) कां रे, तूं कपडे करून कुठं चाललास?

**उत्तम** : दवाखान्यांतून बाबूचं औषध आणायला चाललों आहें.

**भय्या** : पण, लौकर परत येशील ना! आज अमृतमामांना घेऊन माझ्या घरीं चहाला यायचा आहेस तूं? ध्यानांत आहे ना?

**अमृत** : हो-हो बुवा! भय्यासाहेब, आज तुम्हीं आम्हांला जरूर चहा दिला पाहिजे. कारण, आतां लौकरच तुम्ही आमचे पाहुणे होणार! उत्तम, 'आपली कमळी, अन् भय्यासाहेब लौकरच विवाहबद्ध होणार' अशी अमृतमामाच्या गॅझेटमध्यें आज नवीन बातमी आहे!

**भय्या** : ( हंसून ) आणि जादा मजकुरांत 'भय्यासाहेबाच्या लग्नाबरोबरच उत्तमाचा विवाह होणार' हा मजकूर आहे, तो गाळलात वाटतं?

**उत्तम** : छे, त्या मजकुरांत कांहींच तथ्यांश नसला पाहिजे! भय्यासाहेब, मी व कमा माईच्या त्रासाला कमी पडतों म्हणून लग्न करून घेऊन त्यांत तिसऱ्या जिवाची भर कशाला घालूं? आतां ताई सुटणार म्हणून मला आनंद मात्र झाला! शिवाय, परीक्षा पास झाल्याशिवाय लग्न करायचंच नाहीं, असा मीं निश्चय केला आहे!

**अमृत** : देअर यू आर! आणि म्हणूनच ही बातमी गॅझेटमध्यें प्रसिद्ध झाली नाहीं. नाहींतर अमृतमामाची मुलगी, उत्तमाला बायको म्हणून मिळायची असतांना ही बातमी प्रसिद्ध झाल्याशिवाय राहिली असती काय? बरं पणं, जरूर पत्र पाठवा बरं?

**भय्या** : बरं अमृतमामा, आम्ही पुढं जातों तर?

**अमृत** : हो–हो जरूर. पुढें जाऊन स्टोव्ह पेटवून चहाची तयारी करा. नाहीं तर मलाच येऊन सर्व तयारी करावी लागेल! ( उत्तम व भय्यासाहेब जातात ) (स्वगत) अण्णासाहेब मला म्हणतात, 'अमृत, तूं सांगतोस तें सर्व मला पटतं!' अण्णासाहेब, तुम्हांला सर्व कळतं, पण वळत मात्र कांहीं नाहीं; असं म्हणावं लागतं. माईसाहेब व केशवमामा या दोन चक्रांच्या साह्यानं तयार केलेल्या संसाराच्या सायकलवर बसून उतार वयाच्या वाटेवर, आमचे अण्णासाहेब झपाट्यानं निघाले आहेत.! उतार वयाचा उतार, आणि ही फॅशनेबल सायकल, यांच्या ताब्यांत अण्णासाहेब पूर्ण सांपडल्यामुळं, शेवटपर्यंत त्यांचा त्यांना कसा काय तोल संभाळला जातो याची जबर शंकाच आहे. इथं वरवर पाहिलं तर सर्व कांहीं ठाकठीक दिसतं आहे, कारण, बंदोबस्तच तसा कडेकोट! पण ताईच्या

त्या दोन अर्भकांकडं पाहिलं, म्हणजे सावटाखालीं झाडं कशीं खुरटत असतात, किंवा पारधी पाठीस लागलेल्या सशांची जी स्थिति असेल, त्याच स्थितींत माझ्या ताईचीं दोन अर्भकं, सांपडलीं असल्यामुळें चांगल्या आश्रयासाठीं जागा शोधीत असल्याचं, त्यांच्या डोळयांकडे पाहतांना मनांत आल्याशिवाय रहात नाहीं! उत्तमावरील अण्णासाहेबांचा राग अजून कमी झाला नाहीं, हें आतां तर मला स्पष्ट दिसलं. कमीला या केशवाच्या गळयांत बांधण्याचा माईसाहेबांचा बेत आहे, हें उत्तमानं सांगितलं; आणि त्यांच्या वर्तनावरून तोच देखावा दिसतो आहे. उत्तम कमीला जगांत जगायचं म्हणजे माईसाहेबांच्या हाताखालीं मजूर व मोलकरीण या नात्यानं, नाहींतर गत्यंतर नाहीं, अशी आणीबाणीची परिस्थिति, त्या बहीण–भावंडांवर आहे. ( कमला भाजीची झोळी घेऊन येते. ) हें पहा त्याचं प्रत्यंतर! कां कसलं ओझं? मंडई वाटतं? मोलकरणीचं काम तुझ्याकडे केव्हांपासून आलं?

**कमला** : आपण आपल्या घरीं कांहीं आणलं तर मोलकरणीच्या माळेंत बसवायचें काय कारण? मला नको का यायला मंडई करायला?

**अमृत** : हो हो! प्रॅक्टिकल नॉलेज पाहिजेच तर! अलीकडच्या मुलींनाच काय, पण मुलांनाहि भराभर पुस्तकी ज्ञान मिळतं. व्यवहारज्ञान कशाशीं खातात, हें पुढच्या आयुष्यांत त्यांना समजत नाहीं, अशी सर्वत्र हांकाटी झाली आहे. तेव्हां त्याला आळा हा घातलाच पाहिजे! व्यवहारी ज्ञानदानाची सुरवात अण्णासाहेबांच्या घरापासूनच झाली, हें त्यांतल्या त्यांत चांगलं झालं! या एका चळवळीमुळं ‘ देशपांडे घराणं ’ हां हां म्हणतां आतां वर्तमानपत्र प्रसिद्ध होईल! पण कमे, ही क्लुप्ती कोणाची ग?

**कमला** : यांत कसली क्लुप्ती? दादाला बाबूचं औषध आणायला दवाखान्यांत जायचं होतं, केशवमामांना फुरसत नव्हती—

**अमृत** : रिकामपणामुळं वाटतं?

**कमला** : म्हणून मीच्च माईना म्हणालें....

**अमृत** : कीं आज्ञेप्रमाणं ‘ मी मंडई करतें. ’ खरं कीं नाहीं? पण मंडई तरी करतां आली का? चार रुपये शेर बटाटे मिळाले का?

**कमला** : मी इतकी का वेडी आहें? शिवाय आम्हांला बाहेरच्या जगाची ओळख नको का व्हायला? कष्ट करण्याची संवय आत्तांपासूनच असलेली काय वाईट?

**अमृत :** हो, कष्ट करण्याची संवय आत्तांपासून पाहिजेच आहे. पुढंमागं माईंच्या कृपाप्रसादानं एखादा आचारी, पाणक्या नवरा आमच्या कमीला मिळालाच तर पुरण वांटायला किंवा पाणी आणायला कष्टाची संवय आत्तांपासूनच पाहिजे आहे तुला !

**कमला :** भलतंच कांहीं तरी बोलणं मामा तुमचं ! माई कांहीं इतक्या निष्ठुर नाहींत ?

**अमृत :** खरोखरच तुझ्या माईसाहेब इतक्याच निष्ठुर नाहींत ! मी आपला साधा सरळ माणूस—माईसाहेबांचा सगळा निष्ठुरपणा एकदम माझ्या ध्यानांत कसा येणार ? पण भाजीची दुसरी झोळी कुणाची ?

**कमला :** त्या प्रेमाबाई आहेत त्या, त्यांची आहे.

**अमृत :** म्हणजे ! घरोघरीं भाजी पोंचविण्याची एजन्सी आहे कीं काय तुझ्याकडे ? (संतापून) दे फेंकून ती झोळी रस्त्यावर ! शरम नाहीं वाटली त्या बाईला तुला भाजी आणायला सांगायला ? तूं काय तिची मोलकरीण आहेस ?—खरं खरं सांग कमे, असलीं हलकींसलकीं कामं तुझ्या माईसाहेबांनीं मुद्दाम होऊन तुला करायला लाविलीं आहेत कीं नाहीं ? शाळिग्राम आणीत नाहीं म्हणतो भाजी ? आणि त्या केशाला काय काम असतं रिकाम्याला दुसरं ? पण तुला बोलून काय करायचं ! तुम्हांला माईसाहेब मुळींच छळत नाहींत ना ?

**कमला :** मुळींच नाहीं. मीं कधीं तसं म्हटलं आहे का ? आमच्या माई किती चांगल्या आहेत, असंच नाहीं मीं सांगितलं ? माई आम्हांला चुकूनसुद्धां—

**अमृत :** छळल्याशिवाय एकहि दिवस रहात नाहींत म्हण ! काय ग कमे, तूं आणि त्या उत्तमानं मिळून माईच्या विरुद्ध तोंडांतून 'ब्र' काढायचा नाहीं असा निश्चयच केला आहे कीं काय ?

**कमला :** खऱ्या गोष्टीचा निश्चय कशाला करायला पाहिजे ?

**अमृत :** (स्वगत) केवढी या कोंवळ्या जिवावर त्या कजाग बाईनें आपली दहशत बसविली आहे ! ओंठाच्या आंत घुटमळणारे शब्द बाहेर पडूं न देण्याबद्दल कोण या मुलीची धडपड चालली आहे ? शीलवंतीचं लेंकरू ! ही अशी सहजासहजीं का दाद देणार आहे ? (विचार करून) हं, आतां असं करूं ! (उघड) माईनं तुला मंडई करायला सांगितलं नाहीं ना ? आपलं उगीच विचारतों !

**कमला :** नाहीं, मुळींच नाहीं. मी होऊनच त्यांना म्हणालें—

**अमृत :** मी माईनाच विचारतों—

**कमला** : ( घाबरून ) काय ?

**अमृत** : कीं मंडईत जायला तुम्हीं हिला सांगितलं, का हीच गेली ? तुमच्या घरीं गडीमाणसं—

**कमला** : ( एकदम मामाचे पाय धरून ) नको, मामा—नको—तेवढं विचारूं नको. मी पाया पडतें—( डोळ्यांत पाणी आणून ) माईंना विचारूं नको कांहीं !

**अमृत** : कां ! कां विचारूं नको ? माईसाहेबांनीं तुला सांगितलं नाहीं ना ? ( शाळिग्राम प्रवेश करतो. ) वेडे मुली, माझ्याजवळही खोटें बोलतेस ? आपल्या घरांतल्या कागाळ्या दुसऱ्याजवळ सांगूं नयेत, हें खरं; पण माझ्याजवळ सांगायला कोणती हरकत ? आणि तूं सांगितलं नाहींस तर मला कळायचं रहातं असं का तुला वाटतं ? तूं नाहीं म्हणतेस; उत्तम सांगतों कीं, कोणत्या सावत्र आया छळीत असतील त्या असोत, पण आमच्या माईवर सावत्रपणाचा आळ आहे इतकंच काय तें ! ( शाळिग्रामाकडे पाहून ) दे शाळिग्रामाजवळ ती झोळी ! ( ती झोळी देते. )

**शाळिग्राम** : ही झोळी आणण्याकरतांच या मुलीच्या पाठोपाठ मी गेलों होतों. रोजचाच प्रकार आहे हा ! मी दारापर्यंत झोळी नाहीं घेऊं देत हिला; पण दाराच्या आंत झोळी माझ्या हातांत असलेली माईंना नाहीं बघवत—

**कमला** : ( त्याला दटावण्याच्या स्वरांत ) शाळिग्राम—

**अमृत** : आतां त्यानं काय सांगायचं राहिलं आहे म्हणून त्याला दटावतेस कमे ? आणि तो का तुझ्या दटावण्याला ऐकणार आहे !

**शाळिग्राम** : मामासाहेब, तुमच्या गांवाला तरी न्या या मुलांना चार दिवस—तेवढीच सुटका होईल त्यांची ?

**अमृत** : माझा विचार तोच आहे.

**कमला** : ( आनंदानें ) खरंच, मामा कधीं नेशील आम्हांला आजोळीं ? मी येणार हं ! केव्हां नेणार ?

**अमृत** : कशाला ? तुम्ही माईच्या सुखसावलींत असतांना, मी कशाला तिकडे माझ्या खेड्यांत नेऊन तुम्हांला दुःखांत टाकूं ?

**कमला** : [ विरमून ] हें काय मामा ? [ उत्तम येतो ] मामा, उत्तमला देखील घ्यायचं बरं का बरोबर ? दादा, आपण आजोळीं जाणार, मामा नेतो आहे आपल्याला हो! मामा नेतो आहे आम्हां दोघांना. नेणार ना मामा ? आम्ही आजोळीं येणार हं. केव्हां जायचं ?

**अमृत** : [हंसून] अग पण हो! मी आत्तांच का जायला निघालों आहें! भारीच उतावळी आहेस तूं! मी तुमच्या घरीं आलों आहें, राहूं तरी द्या ना मला चार दिवस! (स्वगत) पिंजऱ्याच्या पारतंत्र्यांतून निसटतांना, त्यांत असलेल्या पक्षांना जितकी उत्सुकता वाटत असेल, तितकी उत्सुकता या मुलीच्या तोंडावर, तिला न जुमानतां, नाचत आहे! स्वातंत्र्यसुखाचा केवढा प्रभाव आहे हा! [उघड] हं, मग काय, येणार म्हणतां माझ्याबरोबर?

**कमला** : हो, येणार म्हणजे? आम्ही आजोळीं येणारच!

**उत्तम** : मलाही चार दिवस त्या गमतीच्या खेड्यांत जावंसं वाटतं–तिथलं निसर्गरम्य सृष्टिसौंदर्य कितीही पाहिलं तरी अपुरंच वाटतं!

**शाळिग्राम** : अरे वा! या मुलांची तर अगदीं निघण्याची तयारीच झाली! मामा कसंही करून न्याच या मुलांना आजोळाला!

**अमृत** : ठीक आहे. उत्तम, कमे, तुम्ही माईंना आणि अण्णासाहेबांना विचारून ठेवा—

**कमला** : (तोंड वाईट करून) हें काय मामा? आम्हीं नाहीं विचारणार! तूंच त्यांना सांग कीं, घेऊन जातों म्हणून! आम्हीं विचारून त्याचा काय उपयोग होणार?

**शाळिग्राम** : यांना जाऊं देऊन मंडई कोण करील? बाबूला कोण घेईल? केशवमामाची सायकल उत्तमशिवाय कोण पुशील? तोंडसुख घ्यावसं वाटलं, हात वळवळायला लागले, तर उत्तम–कमीची पाठ माईंना कशी मिळेल?

**अमृत** : हो, हा तर महत्त्वाचा प्रश्न आहे! मी विचारीन, माझं काय? पण इतक्या महत्त्वाची जबाबदारी तुमच्यावर असतांना, अण्णासाहेब व माई तुम्हांला परवानगी देतील? मला तर कठीणच दिसतं आहे. सध्या सरकारकडून हिंदुस्थानला स्वराज्य मिळायलादेखील जितकं सोपं झालं आहे, इतकंसुद्धां तुम्हांला माझ्याबरोबर न्यायचं सोपं नाहीं!

**शाळिग्राम** : (उत्तम आणि कमलेचीं तोंडें वाईट झालेलीं पाहून) हें काय? मामा तुमची थट्टा करतात, एवढंहि कळेना का? तुम्हांला नेल्याखेरीज राहणार नाहींत ते! उगाच चिडवूं नका मामासाहेब, नेतों म्हणून सांगा!

**अमृत** : बरं, ज्या वेळचं त्या वेळीं पाहूं! जायला अजून पुष्कळ अवकाश आहे! [उत्तमाला] अरे, आपल्याला तुझ्या त्या भय्यासाहेबांकडे जायचं आहे ना? त्यानं चहाला बोलावलं आहे. चलतोस ना?

**उत्तम :** हो जाऊं या. तो वाटच पहात असेल. हें औषध माईंच्याजवळ देऊन येतों—

**अमृत :** मग शाळिग्रामानं दिलं तर नाहीं का चालणार ? नाहीं तर कमी देईल ! कां तूंच दिलं पाहिजेस ! (कमलेला) बरं कमे, जा पाहूं तूं—आम्ही कदाचित् तुझ्या भय्यासाहेबालाहि घेऊन येऊं. चहा करशील का चांगला ? पहा बरं ! चहा चांगला झाला नाहीं तर, भय्यासाहेब तुला पत्करणार नाहींत; केशवमामाच्या गळ्यांत जाऊन पडावं लागेल ! शाळिग्राम, आज तूंच भाजीची झोळी घरांत नेऊन दे. पाहूं या माई काय म्हणतात त्या. [ उत्तमाला ] आतांच औषध नेऊन दिलं पाहिजे का रे ? मग दे, आपण लौकरच परत येऊं ? पण बाटलींतलं औषध तांबडं दिसतं रे ? डॉक्टरला सांग कीं असलं रंगीबेरंगी औषध देऊं नका म्हणावं ! औषध शुभ्र—स्वच्छ देत जा—नाहीं तर असलं रंगीबेरंगी औषध पाहून माई म्हणावयाच्या, कारट्यानं वीषच घातलं आहे औषधांत. सावधगिरी ठेव याबद्दल ! चल, मी कपडे करून येतों. [ सर्व जातात. ]

---

## प्रवेश ३ रा

[ **स्थळ :** माईसाहेबांची खोली. केशव, माई व प्रेमाबाई बसल्या आहेत, असा देखावा. ]

**प्रेमाबाई :** पुरे झालं तेवढं अंगावरचं दूध. त्यांत औषध घातलंत ना ? आतां जयशंकर जटाजूट म्हणून देवाचं नांव घ्या, नि मधल्या बोटानं दूध हलवून बाबूला एक घोट पाजा म्हणजे त्याला बरं वाटायला लागेल. हवेत कशाला डॉक्टर नि वैद्य !

**केशव :** ( मुलाकडे पहात ) पण त्याला थोडं बरं वाटतं आहे ना ? बाकी प्रेमाबाईचीं टाणाटोणीं डॉक्टर—वैद्यांना ऐकायचीं नाहींत ! मला वाटतं, त्याला झोंप येत आहे—

**प्रेमाबाई :** हं यायचीच; झोंप यायला लागली कीं दुखणं गेलं म्हणून समजावं. आमच्या पणजीजवळचीं औषधें अशींच झाडामुळ्यांचीं !—पण माई, अगोदर निजवा बघूं बाबूला—

**माई :** असूं दे जरा त्याला मांडीवर ! माझ्या किनई आतां जिवांत जीव आला !—सारखा टाहो पसरलान् त्यानं ! माझा जीव बाई कसा उडून गेला.

( मुलाचा मुका घेते ) राजा, कसं घाबरविलंस मला ! ( बाबूला झोंप लागते. )

**केशव** : उत्तमाला डॉक्टरकडे जायला सांगितलं होतंस ना ?–

**माई** : होय, जातों म्हणून गेला आहे–कधीं येईल तेव्हां खरं !–त्याला बोलायची का सोय आहे सांगा ! होईल आठवण तेव्हां येईल ! त्याचं कशाला ! प्रेमाबाई, तुम्हांला सांगतें, ही मुलगी का आतां लहान आहे ?–तिनें नको का जवळ असायला ? मंडईतून भाजी घेऊन आली तेवढी, कीं झालं जसं कांहीं दिवसाचं काम ! जाऊन पहा हवं तर, आतां आपली त्या पुस्तकांत नी कागदांत बसली असेल !

**प्रेमाबाई** : खरंच ! शर्थ आहे बाई तुमच्या सोशिकपणाची ! तुम्ही म्हणून सोसूं जाणें ! तुम्हीं कांहीं म्हणा,–मुलं तुमचीं कांहीं तशीं सरळ नाहींत–माझ्यासारखं बोलूं नका तुम्हीं, पण मला सांगा, मीं तुमच्या मुलांचं काय केलं आहे हो ! पण मी जेव्हां पहातें–तेव्हां आपलं तुमच्या घरीं येतां जातां माझ्याकडे कांहीं चमत्कारिक नजरेनंच पाहातात–आणखीं वर हिडिसपणानं हंसतातहि !–हें हो काय ?

**माई** : तें कांहीं विचारूं नका मुलांचा उच्छृंखलपणा !–माझी मीच म्हणून निभावलें आहें बरं या घरांत !

**प्रेमाबाई** : पण तुम्हांला काय इतकं त्या मुलांना भिण्याचं कारण ? सडकून चांगलीं कामं सांगून करून घेत जा कीं !

**केशव** : ताई आमची भित्रीच ! आणि प्रेमाबाई, तुम्हीं पण भित्र्याच ! मला आतां समजलं, तुम्हीं आमच्या घरीं पहिल्यासारख्या कां येत नाहींत तें. आमच्या मुलांनाच भिऊन यायचं टाकून दिलं होतंत ? हिंदुस्थानांतल्या स्त्रिया हाडाच्या भित्र्याच !–मी म्हणतों तें उगाच नाहीं !–तेंच इंग्लंडच्या स्त्रियांकडे पहा, जर्मनींतील स्त्रियांशीं सहवास ठेवा. पॅरिसच्या महिला समाजांत शिरा, नाहीं तर अमेरिकेंतील वनितावृंदाशीं परिचय करा–त्या तुम्हांला भित्र्या कधींही दिसायच्या नाहींत !–त्या धीटपणाच्या बाबतींत मोठमोठ्या पुरुषांना मागें सारतील ! हेंच, मी म्हणतों तें हेंच ! आमच्या स्त्रियांच्या आंगचा भित्रेपणा गेल्याशिवाय इतर उन्नत देशांप्रमाणें आमच्या देशांतल्या स्त्रियांना स्वातंत्र्य, समान हक्क मिळणं शक्य नाहीं !—

**प्रेमाबाई** : ( आनंदानें ) बाई–बाई–बाई–केशवमामा कुठल्या गोष्टी बोलतील आणि कुठल्या नाहीं ! आपलं कांहीं बोला कीं, केशवमामांच्या त्यावर गोष्टी नाहींत असं कधीं व्हायचंच नाहीं !–मला तर किनई माई, केशवमामा बोलूं

लागले म्हणजे ऐकतच रहावंसं वाटतं आणि त्यांच्याजवळून हलूं नयेसं पण वाटतं !–काय बाई तरी मोहिनी आहे त्यांच्या बोलण्यांत ! हेंच पहा ना, मी आलें त्याला किती वेळ झाला आणि जाईन जाईन म्हणून म्हणतें पण माझे पायच निघत नाहींत इथून—

**माई** : आमचा केशव आहेच तसा बोलका !–कुठलं काय आणील नी काय बोलत बसेल ! कशी त्याला चारी खंडाची माहिती मिळते नि इतकी त्याच्या ध्यानांत कशी राहते ? त्याचा तोच जाणे !

**प्रेमाबाई** : आहे देवाची देणगी !–बरं जातें मी ! बाबूला झोंप लागली आहे ना ?–उठला कीं खेळायला लागेल–लावा बघूं कुंकूं !

**केशव** : ताई, चहाचा एक कप तर देशील प्रेमाबाईंना !

**प्रेमाबाई** : आतां का चहाची वेळ आहे ? मला नको चहा–कुंकूं लावा म्हणजे झालं—

**केशव** : असं कुठं झालं आहे ?–तुम्ही कुंकूं लावणं जितकं महत्त्वाचं समजतां तितकाच महत्त्वाचा भाग आम्हीं चहासंबंधानें समजतों ! चहाचं नांव काढल्यावर पाऊल पुढें टाकणं म्हणजे गैरशिस्तच !–एक वेळ कुंकूं लावायचं विसरलं तरी चालेल, त्याचं नाहीं महत्त्व तितकंसं आतां—

**माई** : अरे, काय बोलतोस केशवा हें ! ( प्रेमाबाईला ) चहा घ्यायला लावल्याखेरीज केशव सोडायचा नाहीं तुम्हांला ! केशवा, आतां थोडा पोक्तपणा धरीत चल !–प्रेमाबाईंना नाहीं तुझ्या बोलण्याचा राग यायचा, पण दुसरं नाहीं कुणी ऐकून घेणार हो ! बरं, प्रेमाबाई, बसा अम्मळशा. मी बाबूला निजवतें आणखीं मीच तुम्हांला चहा करून घेऊन येतें ! केशवाची बायको येईपर्यंत त्याचं काम आहे खरं माझ्याकडे !

**प्रेमाबाई** : कमीला नाहीं का चहा करायला लावीत ? तिला आतांपासून असूं द्या कीं चहाची संवय ?– म्हणजे लगीन झाल्यावर केशवमामांचा चहा करणं तिला जड जाणार नाहीं !

**माई** : ती काय आज नाहीं उद्यां करील ! आतांच्या वेळेला तर मला करायला पाहिजे ना ? बसतां ना तुम्ही इथंच–मी आणतें चहा करून–( जाते. )

**प्रेमाबाई** : आतां न बसून काय करूं ? ( केशवकडे पहात ) केशवमामा मला जर सोडीत नाहींत तर आतां नाहीं म्हणायचं म्हणजे रानटीपणा व्हायचा ! आपण आतां कमीशीं करा लग्न म्हणजे हा चहा करायचा माईंना त्रास तरी नको–

**केशव** : आमच्या राणीच्या हातचा चहा केव्हां मिळेल म्हणून उत्सुकता तर खूप दिसते आहे ! बोलावूं म्हटलं त्या वेळेला आपल्याला !
**प्रेमाबाई** : ( तिरव्या नजरेनें पहात ) होईल का पण राणीच्या राज्यांत आठवण ?
**केशव** : अशी शंका तरी कां आली ?
**प्रेमाबाई** : कां ? शंका यायला कांहींच कारणं नाहींत का ?–कमीशीं लग्न व्हायचं ठरल्यापासून दुसऱ्या माणसांची आठवण बुजत चालली आहे हें कुणाला कळतच नसेल जसं कांहीं ?–मी मुळीं या घरीं यायचंच सोडून देणार आहें—
**केशव** : कां ? मुलांच्या भीतीनं कीं काय ?–प्रेमाबाई, असं भलतंच कांहीं तरी मनांत नका आणीत जाऊं ?–आमच्या ताईनं कधीं परकीपणा दाखविला आहे का ?
**प्रेमाबाई** : नाहीं हो, मुळींच नाहीं ! पण मला मुळीं या घरीं यायचंच नाहीं !
**केशव** : कां ?–काय झालं ?
**प्रेमाबाई** : कालच्या माहेरपणाला माझी काकू गुलाबाचं फूल पाठवून देणार आहे, म्हणून मीं घरीं मोठ्या तोंडानं सांगितलं होतं—
**केशव** : ( आठवण करून ) हो–हा हो–हा ! प्रेमाबाई, हें मीं अगदींच विसरलों ? अहो, आठ दिवस झाले, तुमचा तो जिन्नस माझ्या खिशांतच आहे. मला अगदींच कसा विसर पडला पहा ! पण आठ दिवसांत तुमची माझी गांठ तरी कधीं पडली ?–( खिशांतून फूल काढतो ) हा पाहिलांत तुमचा जिन्नस ? या घरीं येणार नाहीं म्हणून आतां नाहीं ना निश्चय करणार ?
**प्रेमाबाई** : मी रागावलें नव्हतें, सहज आपली आठवण केली. शिवाय मुंबईला जातांना दोनशें रुपये माईनीं दिले होते हें कळलं, त्यावेळींच मीं मनांत समजलें.
**केशव** : मी आतां हें हातांत नाहीं देणार—
**प्रेमाबाई** : मग ?
**केशव** : मी माझ्या हातांनीं आपल्या बुचड्यांत खोंवणार.
**प्रेमाबाई** : मीं नको कधीं म्हटलं होतं !
**केशव** : ( बुचड्यांत फूल घालतो ) काकूंनीं माहेराहून पाठविलं म्हणूनच सांगणार ना ?
( एका बाजूनें उत्तम औषध घेऊन व दुसऱ्याः बाजूनें माई चहा घेऊन येते )
**उत्तम** : माई, हें बाबूचं औषध—
**माई** : इतक्या लवकर सोडलं कां डॉक्टरनं ? बाबूची काळजी तुला कशाला असेल ? तुमच्या तो डोळ्यांत सलायचाच !–तुम्ही बाबूला मारायला बसलां

आहांत रे !–उगीच नाहीं तिकडून बोलणं होत. जा–जा–कुठं गांवांत पाटीलकी करायची राहिली असली तर उरकून या जा. संध्याकाळीं इपीसांतनं येणं झालं म्हणजे पुढं उभें करून विचारीन कीं चिरंजीव यापुढें असेच वागायचे का !–औषध आणलं म्हणे ! ओतून टाक तें नेऊन–जा म्हणतें ना येथून–(उत्तम जातो)

**केशव** : (स्वगत) पाहिलंच अखेर कारट्यानं !

**प्रेमाबाई** : (स्वगत) मला तरी कुठली बुद्धि सुचली कोण जाणे ! आतां माई तरी काय म्हणतील ?

**माई** : (प्रेमाबाईकडे पाहात) हां–प्रेमाबाई, घ्या हा चहा—

**प्रेमाबाई** : माई, आम्ही तुमचा शेजार उद्यांपासून सोडणार आहों ! तुमच्या पेठेंतसुद्धां राहणार नाहीं.

**केशव** : आमचीं मुलं हंसतात म्हणूनच का ? अहो उद्यांच्या उद्यां त्या कारट्यांचा बंदोबस्त करतों, एवढी काळजी हवी कशाला ?

**माई** : तरी मीं म्हणत होतें कीं–या कारट्यांची गय करून उपयोग नाहीं म्हणून. प्रेमाबाई ! तुम्हीं थोडं मनावर घ्या आणि आम्हांला मदत करा—

**केशव** : उद्यांच्या उद्यां कार्ट्यांना घर सोडायला लावूं या. (डोकें खाजवीत) अजून अजबशी युक्ति निघेना. अण्णासाहेबांना पटली पाहिजे ती ! त्यांनीं होऊन त्याला घराच्या बाहेर घालविला पाहिजे—

**माई** : युक्ति पण युक्ति निघाली पाहिजे !–अगदीं जालीम वीष ! तें वीष त्या कारट्यालाच काय पण त्याचें रक्षण करणाऱ्याच्याहि अंगांत भिनलं पाहिजे. त्या कारट्याचा कैवार घ्यायला त्याचा मामा राहिला आहे ना !–त्याच्या अंगाचा भडका झाला पाहिजे ! मग पाहूं दे बहिणीच्या मुलांना कसा राखतो तें ! माझी फजिती केल्याचं तो विसरला असेल, पण मी विसरलें नाहीं !–केशवा, तूं त्याला एकदां तरी फजीत केलं आहेस का रे ?

**केशव** : त्याला तशी अजून संधीच आली नाहीं. (स्वगत) त्यानं आज भर चव्हाट्यावर माझी शोभा केली हें सांगण्यांत कांहीं शोभा नाहीं. (उघड) त्या पोरट्याला धुळीचे दिवे दाखविले म्हणजे त्याच्या त्या घमेंडखोर मामाची फजितीच ती !–युक्ति सांपडेना अजून !

**प्रेमाबाई** : मी सांगेन युक्ति त्याला !–मी म्हणतें तसं जर झालं तर बघतां बघतां अण्णासाहेबांच्या मनांतून हीं मुलं उतरतील, आणखी त्यांना देशोधडीला लावल्या-शिवाय दुसरा मार्गच नाहीं, असं अण्णासाहेब कबूल करतील !

**केशव** : असली अजब युक्ति निघाल्यावर आम्हीं कां ऐकणार नाहीं ?

**माई** : तुमच्या युक्तीनं उत्तमाचा नाश सफाईनें झाला तर, प्रेमाबाई, तुमच्या रूपानं मला अंबाबाई प्रसन्न झाली असं समजून मी तुमची खणानारळानं ओटी भरीन ! तुम्हीं सांगतां त्याप्रमाणं केलं तर तें कारटं मेलं नाहीं, तरी या घराला कायमचं अंतरेल ना ?

**प्रेमाबाई** : शंकाच नाहीं !

**माई** : मग सांगा तर !

**प्रेमाबाई** : उत्तमाबरोबर कमीचाहि बंदोबस्त झाला पाहिजे.

**केशव** : ( गोंधळून ) तिचा काय बंदोबस्त करायचा ? तिला घराबाहेर घालवणार कीं काय ?

**माई** : तिचा बंदोबस्त मी करतें ! तिकडच्या पाठीमागें लागून तिला केशवाच्या गळ्यांत बांधतें. मग तिची नको काळजी करायला ! पण त्याचा पक्का बंदोबस्त झाला पाहिजे. होईल ना पक्का बंदोबस्त ? अगदीं पक्का !

**प्रेमाबाई** : अगदीं पक्का—अगदीं पक्का बंदोबस्त ! तुम्ही नका सोडूं कमळीला. उत्तमाच्या बंदोबस्ताचं काम माझ्याकडे लागलं; अगदीं पक्का बंदोबस्त. ( चोहीं-कडे पाहून ) काय करायचं तें इथं नाहीं सांगत. चला स्वयंपाकघराकडे, तिकडेच सगळं सांगतें. ( तिघेंहि जातात. शाळिग्राम येतो. )

**शाळिग्राम** : बंदोबस्त ! पक्का बंदोबस्त ! किती धडपड केली, तरी सगळं ऐकायला मिळालं नाहीं ! बंदोबस्त !—कारट्यांचा बंदोबस्त ! माईसाहेब, अशा भयंकर कल्पनांनीं तुम्हांला पछाडलंच ना अखेर ? नीट सगळं ऐकायला मिळालं नाहीं ! तरी मला संशय येतांच झाडाला पाणी घालायचं सोडून कानोसा घ्यायला धांवलों ! आतां याच्यापुढें मात्र ऐकायला जाण्याचा प्रयत्न करणं ठीक नाहीं. बंदोबस्त अं ! पण यापेक्षां आणखीं काय ऐकायचं ? हें त्रिकूट—ह्या उतावळ्या भावंडांना ही शेजारीण येऊन मिळाली असं दिसतं ! उत्तम—कमळीचा पक्का बंदोबस्त करणार ! तसला भयंकर प्रसंग त्या मुलांवर येणार, मग मी म्हातारपणीं या घरीं कशाला राहिलों ? मी आतां काय करूं ? ( अमृतमामा प्रवेश करतो )

**अमृत** : म्हातारबुवा, काय पहातोस असा वांकून तिकडे ? कसली टेहळणी चालली आहे ?

**शाळि०** : ( अमृताचे पाय धरून ) मामासाहेब, कसंहि करून माईच्या जाचांतून या दोन मुलांना सोडवा, इतकीच माझी विनंति आहे.

**अमृत** : मी इथं आल्यापासून तूं रोज मला हेंच सांगतो आहेस! यांत काय विशेष आहे? पण मी तुला असं विचारीत होतों, कीं असा मध्येंच उभा राहून कानोसा कसला घेत होतास?

**शालि०** : तेंच तर मामासाहेब मी तुम्हांला सांगतों आहें? नाहीं, आतां त्या बहीणभावंडांचे हाल पहावत नाहींत या म्हाताऱ्या डोळयांनीं! कांहीं मनावर घ्या. अहो, याच्यापुढं या घरांत मुलांची धडगत नाहीं बरं!

**अमृत** : तूं अगदीं विचित्र प्राणी आहेस बघ शालिग्राम! काय झालं तें नीट मला सांग तरी!

**शालि०** : काय सांगूं मामासाहेब? घरांतल्या गोष्टी तुम्हांला दिसत नाहींत?

**अमृत** : माईसाहेबांच्याबद्दल तूं सांगतो आहेस का? अरे, हें चालायच्चंच! सावत्रपणाच्या संबंधांत असले प्रकार कुठंही असायचेच! त्याला काय करायचं? बारीकसारीक गोष्टींकडे लक्ष देऊन भागत नाहीं शालिग्राम! मुलांचं नशीबच तसं त्याला कोण काय करणार? बरं मला तसं कांहीं विशेष दिसत नाहीं—माई तशा कांहीं वावग्या नाहींत!

**शालि** : नाहीं हो मामा! तुम्ही अजून डोळे उघडून पहात नाहीं! बारीकसारीक गोष्टीकडे लक्ष कोण देईल? पण मामा! ब्रह्मांडाला आग लागण्याचा प्रसंग येऊन ठेपला आहे. आतां मनांतल्या मनांत राहवत नाहीं! मामासाहेब, या दोन पोरक्या पोरांकारितां माझा जीव ओढतो आहे! लोकांचे काबाडकष्ट उपसण्याची ताकद माझ्या अंगांत राहिली नाहीं, पण मी इथं कां राहिलों? या दोन पोरांचे—उत्तम—कमळीचे पाय भुईला नीट लागावे म्हणून! मामा, अजून घरांतल्या प्रकाराकडे लक्ष द्या—माई साध्या नाहींत बरं! मामा, उत्तम—कमळीच्या आईनं—माझ्या अन्नदात्या माउलीनं, मामा, प्रत्यक्ष तुमच्या बहिणीनं, मरणाच्या वेळीं मला जवळ बोलावून सांगितलं, कीं अण्णासाहेबांना ऑफिसच्या कामामुळं मुलांच्याकडे लक्ष द्यायला वेळ मिळायचा नाहीं, तूं माझ्या मुलांचा सांभाळ कर! मामा, काय सांगूं, माझ्याकडून त्या दोन मुलांना सांभाळण्याचं वचन घेतलं, तेव्हां तिला बरं वाटलं. मीं त्या मुलांच्यासाठीं इथं जीव गुंतविला आहे, नाहीं तर माईसाहेबांच्या चाकरीला केव्हांच रामराम ठोकला असता! त्याच मुलांवर आतां कोणता भयंकर प्रसंग येणार आहे परमेश्वर जाणे!

**अमृत** : म्हणजे!—असं झालंय् तरी काय विशेष?

**शाळि०** : आणखीं विशेष काय व्हायचं? 'कारट्यांचा पक्का बंदोबस्त–' हे माईच्या तोंडचे शब्द या कानांनीं दोन क्षणापूर्वी ऐकले.

**अमृत** : असं म्हणतोस ?–माईच्या तोंडचे शब्द ?

**शाळि०** : होय मामा, खोटं कशाला सांगूं? म्हणून म्हणतों, माई मुलांचा पक्का बंदोबस्त करणार. माई मुलांना मारणार–मामा मुलांना वांचवा; या सावत्र आया काय करतील? सावत्र मुलांना मारतील,–घरंदारं मातीला मिळवतील, कुळाचा लौकिक, अब्रू घालवतील आणि साऱ्या दुनियेला आग लावून सोडतील! मामा, मुलांना पाठीशीं घाला!

**अमृत** : वेडा आहेस शाळिग्राम, असं व्हायचं नाहीं !–मुळींच काळजी करूं नकोस! शाळिग्राम, तूं मुलांवर इतकं प्रेम करतोस, तेव्हां तुझं प्रेमच त्यांचं रक्षण करील. तूं सांगतोस तसाच जर खरा प्रकार असेल तर मी लक्ष दिल्या-खेरीज कसा राहीन ?–मीं कांहीं म्हटलं तरी माझे डोळे उघडे नसतात किंवा मला कांहीं समजत नाहीं असं समजूं नकोस.माईची वागणूक माझ्या पूर्ण ध्यानांत आहे.

**शाळि०** : मामा, एकट्या माईवरच नाहीं, तर त्यांच्याबरोबर केशवमामा व प्रेमाबाई–माईची मैत्रीण–आहेत.

**अमृत** : मला माहीत आहे तें! तूं म्हणतोस तसंच असेल तर तुझे कान व डोळे उघडे ठेव. माझे आहेतच! बरं, उत्तम–कमा कुठं आहेत पहा. ( शाळिग्राम जातो. ) सावत्रपणाच्या बाबतींत घराण्याचा नाश कसा होतो, हें शाळिग्रामासारख्या अडाणी म्हाताऱ्याला समजतं आणि त्याचं मन तळमळतं! परंतु सावत्रपणाची परिस्थिति उत्पन्न करणाऱ्या शहाण्यासुरत्या लोकांच्या ध्यानांत ही परिस्थिति येऊं नये, किंवा त्यांना कळूं नये, ही दुर्दैवाची गोष्ट नव्हे काय? ज्यांना स्वतःच्या कुटुंबाची वस्तुस्थिति ओळखत नाहीं, त्यांना जगांत काय चाललं आहे, हें तरी काय कळणार? अण्णासाहेबांच्या घरांत उत्तम–कमीचे हाल कुत्रा खात नसेल, ही केलेली कल्पना समक्ष पाहतांना अक्षरशः खरी ठरली. अण्णासाहेबांच्या हातून उत्तम–कमीचं कल्याण केल्याखेरीज माझ्या मनाला स्वस्थता कशी येणार? ( खिन्न झालेला उत्तम घरांतून येतो. उत्तम नर्व्हस झाला आहे! डोळे भरून आले आहेत! )

**उत्तम** : ( धांवत येऊन अमृताला मिठी मारून ) मामा, काय सांगूं तुला? ( हुंदका देत ) मामा—

**अमृत** : अं हं !– कांहीं सांगूं नकोस! ( स्वगत ) दुःखाकष्टाची भानगड

दिसते आहे. ( उघड ) तुझं दुःख सांगून मला दुःखी कां करतोस ? तुझं दुःख घालवायला आलेला मी–सदा आनंदी माणूस–मलाच दुःखी कर !– तुझं दुःख ऐकायला तुझी कमी, तुझा भय्यासाहेब आहेतच ! माझ्यासमोर कसा आनंदी असत जा ! जा, इतक्यांत भय्यासाहेब येणार आहेत त्याला बसायला सांग; मन शांत कर–जा. ( उत्तम जातो. ) गेला ! जा म्हणायचा अवकाश, मुकाट्यानं गेला. सात्विकतेचा केवळ गाभा ! पण त्याची आबाळ झाल्यानं केवळ सोशिकपणाखेरीज कोणचाच गुण त्याच्या अंगीं राहिला नाहीं. पण असं होऊन काय उपयोग ? बाळांनो ! तुमची ही दीनावस्था दूर केल्याखेरीज हा तुमचा अमृतमामा केव्हांही परत जाणार नाहीं ! ( जातो. )

---

## प्रवेश ४ था

[ **स्थळः**—अण्णासाहेबांची खोली. अण्णासाहेब आजारी आहेत. शाळिग्राम पाय चेपतो, असा देखावा. ]

**अण्णा** : आतां असं कर, तें पांघरूण आंगावर घाल. टेबलावरचं तें थर्मामिटर आण–आणखीं अमृताला इकडे पाठवून दे, अन् तूं जा घरांतल्या उद्योगाला. ( शाळिग्राम जातो. ) या तापानं तर अगदीं पाठ घेतली आहे; कांहीं एक सोसेनासं झालं, ऑफिसचं काम, संसाराचा व्याप. मी असा आजारी पडलों, म्हणजे मला भीतिच वाटायला लागते. आजारी पडतांच त्या आजारांतून आपण नीट होऊं काय ?–असाच प्रश्न पुढें उभा राहतो आणि मग, जर नीट झालों नाहीं, तर, माझ्या पाठीमागं, माझ्या मुलाबाळांचं, बायकोचं कसं होईल ? त्यांचा संभाळ कसा, आणि कोण करील ? आपल्या संसाराची जमविलेली घडी विसकट-णार ? ( थर्मामिटर लावलेला काढून पाहून ) किती तीन–साडेतीन डिग्री ताप माझ्या अंगांत ! आतां मी कसचा वांचतों ? ( अमृतमामा प्रवेश करतो, त्यास थर्मामिटर दाखवून ) पाहिलास अमृत ताप ? साडेतीन डिग्री आहे–आतां मी यांतून कसा वांचणार !

**अमृत** :अण्णासाहेब हा मलेरिया फीव्हर आहे ! हा यापेक्षां जास्त चढला तरी भ्यायचं कारण नसतं त्याला ! तुमच्या या पुण्यांत आजकाल ड्रेनेजमुळं मलेरियानं ठाणं दिलं आहे. त्यामुळं असं होतं. मलेरिया फीव्हरला भ्यायला कशाला पाहिजे ? वीस ग्रेन क्विनाईन घेतलं कीं ताप पसार !–तुम्ही अगदीं घाबरूं नका !

**अण्णा** : नाहीं, आतां धीरच निघत नाहीं. ऑफिसची ती दगदग, महिन्यांतून एकदोन वेळ या तापाचं बिन्हाड, माझं उतारवय झालेलं, मनाला धीरच निघत नाहीं....

**अमृत** : तरी पूर्वीची माणसं दुखण्याला काटक म्हणतात ! अण्णासाहेब, खरंच घाबरायला नको !

**अण्णा** : तें टेबलाचं पलीकडलं ड्रॉवर उघड. त्यांतून वर ठेवलेली तेवढी पाकिटं काढ. मला तुला त्यांतलं कांहीं दाखवायचं आहे. मला असं आजारानं पछाडलं, म्हणजे माझ्या जीविताचा भरंवसा मला वाटत नाहीं. म्हणून कोणाजवळ तरी दाखवून ठेवावं, सांगून ठेवावं, असं वाटतं. अनायासं तूं इथं आला आहेस. मी माझ्या पाठीमागं सर्वांची व्यवस्था कशी कशी करणार आहें, तें तुला दाखविलं म्हणजे बरं–( अमृत ड्रॉवर उघडून पाकिटं काढून आणतो ) हां, तीं पाकिटं काढ, मीं आपल्या वुईलचा ड्राफ्ट केला आहे, तो पहा, म्हणजे तुला कळेल कीं, मीं उत्तमाचं कांहीं नुकसान केलं नाहीं. आनंदी मला सोडून गेल्यावर आणि तिनं उत्तम–कमा मागं ठेवल्यावर, लौकिकदृष्टया पुन्हां नवा संसार थाटण्याच्या भानगडींत मीं पडायचं नाहीं. पण त्याशिवाय तरणोपाय काय होता ? माझीं मुलं कोणाच्या दारांत नेऊन उभीं करायचीं होतीं ? मीं ऑफीस संभाळायचं कसं आणि संसार सांभाळायचा कसा ? पहा , नीट मसुदा वाचून पहा, मीं पुनः संसार थाटला तरी आनंदीच्या मुलांना मीं नव्या संसाराच्या नादांत नागवलं नाहीं, हेंच तुला दिसेल. शिवाय दैवयोगानं माझी मंडळीहि कांहीं गैर मिळाली नाहींत, तूं पहातोच आहेस !

**अमृत** : [ वुईल वाचीत ] छेः छेः ! माई तशा मुळींच गैर नाहींत; आणि तुम्हीं तुमच्या मुलांचं अकल्याण तरी कां कराल ?

**अण्णा** : पण लोक म्हणायचे ना ? नव्याच्या नादीं लागलेला नंदीबल म्हणून लोक बोटं दाखवायला कमी करतील का ? लोकांनीं म्हटलं तर त्याचं कांहीं नाहीं, पण तुझ्यासारख्या नात्यागोत्यांच्या माणसांनीं म्हणूं नये–त्यांतून तूं उत्तमाचा मामा आहेस, तुला माहीत असलेलं बरं. मीं जें काय केलं, तें तुला माहीत असलं आणि स्वर्गांत माझी आनंदी संतुष्ट झाली, म्हणजे मग मला कुणाची पर्वा नाहीं ! वाचलंस ना सगळं ? आहे ना ठीक ?

**अमृत** : आपण वावगं कां कराल ? उत्तम तुमचा, कमला तुमची आणि बाबूही तुमचाच ! आपल्या मुलांचं नीटनेटकं करायला बापाला तिसऱ्यानं सांगायला पाहिजे कशाला ?

**अण्णा** : पण गांवांत बभ्रा तर आहे ना माझ्या घराचा? सावत्रपणाची बाजू–

**अमृत** : लोकांचं त्यांत काय जातं? आपापल्या सोयीप्रमाणें प्रत्येकजण करीत असतो झालं! (उघडलेले कागद पाकिटांत घालीत असतां एका पाकिटांत कोऱ्या कागदाची घडी घालतो.) बरं, माई म्हणजे तशा सावत्रपणाला समजण्यासारख्या नाहींत.

**अण्णा** : परमेश्वरानं इथपर्यंत ठीक आणलं आहे. आतां पुढचं पुढं! (उत्तम औषध घेऊन येतो.)

**अमृत** : आणलंस औषध? अगोदर एक भाग दे पाहूं आणखीं अण्णा-साहेबांची प्रकृति नीट होईपर्यंत औषधाची व्यवस्था तूंच करीत जा. हे कागद टेबलाच्या ड्रॉवरांत नेऊन ठेव. (उत्तम औषध देतो. अण्णासाहेब घेतात. उत्तमाची कागदाकडे नजर जाते. 'मृत्यु पत्राचा मसुदा' हीं अक्षरें पाहून चपापतो व कागद ड्रॅवरमध्यें ठेवतो.) अण्णासाहेब, आतां थोडा वेळ डोळा लागूं द्या, म्हणजे घाम येऊन ताप उतरेल आणि बरं वाटेल!–पुन्हां काय दोन तासांनीं दुसरा भाग द्यायचा ना रे? (उत्तम 'होय' एवढेंच उत्तर देतो.) बरं जा. कमीला अण्णासाहेबांचं खायला करायला सांग–माई देवाला गेल्या होत्या, त्या आल्या का बघ. (उत्तम जातो,)

**अण्णा** : मंडळी येईपर्यंत बैस वाटेल तर वाचीत–पहातों मी डोळा लागला तर?–(झोंपतात. अमृत वाचीत बसतो, तोंच माईसाहेब प्रवेश करते.)

**अमृत** : कित्ती उशीर झाला माई तुम्हांला?–अण्णासाहेबांना ताप आलेला माहीत नाहीं वाटतं? ऑफिसांतून आले, तेंच डोकं बांधून आले!

**माई** : आहे मेलं नेहमींचंच! कुठवर त्याचे सोपस्कार करायचे! महिन्यांतून चार दोन वेळां ताप नाहीं असं नाहीं!–बरं, औषध तरी दिलं का इकडे?–केशव कुठं गेला?–मला कोणीच कसं कळवायला आलं नाहीं?–कमीला तरी पाठवाव-याची होती?–केशव, अरे केशव!

**अमृत** : केशवमामा नाहींत–त्यांची केवढी जंगी सभा आहे शहरांत!–ते इथं कसे असतील?

**माई** : उत्तम तर घरीं नसायचाच!–तो बसला असेल त्या भय्यासाहेबांचं डोकं धरून!

**अमृत०** : त्याचं डोकं धरून!–म्हणजे?–दुखत होतं कीं काय त्याचं डोकं?–बोलला नाहीं कांहीं तसं तो!–तसं असेल तर उत्तमाला त्याच्याकडे अगोदर

पाठविलं पाहिजे. त्याचं इथं कोण आहे?—मित्रानं मित्राला साह्य केलंच पाहिजे. मग पाठवूं का उत्तमाला त्याच्याकडे?

**माई** : अमृतमामाची आपली थट्टाच जिथंतिथं! औषध दिलं का इकडे?

**अमृत** : आम्हीं दिलं. पण ज्याचीं तीं माणसं जवळ असलीं म्हणजे बरं!

(अण्णासाहेब तोंडावरून पांघरूण काढतात)

**अण्णा** : झोंपच येत नाहीं!—अमृत, असं करीनास, उत्तमाच्या हातून नीट नाहीं व्हायचं, केशवमामाहि नाहींत. तेव्हां तूंच डॉक्टरकडे जा आणि एकदां डॉक्टरांना माझ्यापर्यंत घेऊन ये. मला एकदां डॉक्टरनीं समक्ष पाहूं देत.

**अमृत** : (जायला निघतो.) हा निघालोंच!—माई, आपण आहांत ना इथं? (जातो.)

**माई** : (अण्णासाहेबांच्या जवळ जाऊन) इतकं घाबरायला काय झालं?—हा थंडीचा ताप आपल्या मागं नेहमींचाच लागला आहे—किती भ्यायचं पण—आपणच घाबरल्यावर दुसऱ्यांनीं कसा धीर धरायचा?

**अण्णा** : तसा कांहीं मी भ्यालों नाहीं!—आणि तुम्हांला तरी घाबरायला काय झालं?—माझं कांहीं बरं वाईट झालं—

**माई** : (मध्येंच थांबवून) हें काय हें?—असलं काय तें अभद्र बोलायचं?—मी नाहीं कांहीं आपल्याला बोलूं द्यायची हं असं वेडं वाकडं?—एवढ्याशा आजाराला इतकं भ्यायचं?

**अण्णा** : तसं नव्हे, म्हटलं माझं बोलणं आपल्या लक्षांत आलं नाहीं! बाबूचं अन् उत्तमाचं नीट करून ठेवा म्हणून तुम्हींच आमच्या पाठीमागं नेहमीं लागतां ना?—तें करून ठेविलं आहे. तें टेबलाचं ड्रॉवर उघडा. अशा बघतां काय माझ्याकडे?—केव्हां तरी नीटनेटकं करायचंच, तें करून ठेवलं आहे. उघडा तें ड्रॉवर—

**माई** : पण मीं त्याचं आतां नांव तरी काढलं होतं का?

**अण्णा** : तुम्हीं नाहीं नांव काढलं. पण मला काढलं पाहिजे ना नांव?—आणि मी असा आजारी झालों म्हणजे मला तें जाणवतं! घ्या त्यांतलं पाकीट काढून—असूंद्या तुमच्याजवळ. पुढं मागं वेडावांकडा प्रसंग आला, उत्तम तुमच्या कह्यांत नाहीं राहिला, तर त्या कागदाप्रमाणं सरकारदरबार तुम्हांला नीटनेटकं करून देईल—(माई मुकाट्यानें ड्रॉवरांतील पाकीट घेते. चुकून मुख्य पाकीट तेथेंच राहातें आणि कोरा कागद घातलेलें पाकीट माईच्या हातांत जातें.) झालं ना

तुमच्या मनासारखं ?–आम्हीं केव्हांहि मरायला आतां आहे ना तुमची परवानगी ?

**माई :** वाईटसाईट बोलून घ्यायची संवयच लागलेली, तिथं माणसानं काय करायचं !–मीं आपलं सहज केव्हां तरी म्हटलं असेल, तें अशा वेळीं काढायचं ? असलीं कुत्सित बोलणीं बरीं पुरुषानांच शोभतात. बरं, औषध द्यायचं आहे का आतां ?–कांहीं खायला आणलं करून तर खायचं होईल का ?–आणूं का ?

**अण्णा :** तेंच मी सांगणार होतों. कमा कांहीं तरी धडपड करीत बसली असेल चुलीजवळ. पण तिच्या हातानं नीट नाहीं व्हायचं–तेव्हां तुम्हींच आणा जा कांहीं करून–तुम्हीं याल तोंपर्यंत अमृतमामा डॉक्टरला घेऊन येईल—

**माई :** पण तोंपर्यंत झोंपेचा प्रयत्न तरी करायचा !– ( माई जाते )

**अण्णा :** परमेश्वरानं याही स्थितींत माझा संसार कसा अगदीं सुरळीत चालविला आहे. सावत्रपणाच्या कचाट्यांत सांपडलेलीं घराणीं, माझ्या घराइतकीं सुखासमाधानांत असलेलीं कोणाच्या पाहाण्यांत नसतील. तेव्हां परमेश्वराचे मी आभारच मानतों ! खरं पाहिलं तर माझ्या घरांत काय उणेपणा आहे ?– त्रयस्थ पाहुणा, अमृत, तोसुद्धां कबूल करतो ! याहून संसार सुरळीत तो कसा असायचा ? ( पडदा पडतो. )

---

## प्रवेश ५ वा

[ **स्थळ :** उत्तमाची खोली. उत्तम सचिंत बसला आहे, जवळच कमला आहे, असा देखावा. ]

**कमला :** कां रे दादा ? तुझं तोंड कां उतरलं आहे ? सांग ना रे ! असा गप्प कां बसला आहेस ? काय झालं ? कुणी बोललं का ? माई कांहीं म्हणाल्या होय ?

**उत्तम :** कांहीं नाहीं.

**कमला :** होय, खोटं सांगतोस मला ! कांहीं नाहीं झालं, तर तुझं तोंड कां उतरलं आहे ? हो, नक्की कांहीं तरी झालं आहे !

**उत्तम :** काय सांगूं ? खरोखरच कांहीं झालं नाहीं.

**कमला :** नाहीं म्हणून मी कशी ऐकेन ? सकाळपासून तूं आनंदांत होतास ! कांहीं तरी झाल्याखेरीज का तूं दिलगीर झाला आहेस ?

**उत्तम :** ( स्वागत ) हिला काय झालं म्हणून सांगूं ? ( उघड ) भारीच तूं ताई हट्टी आहेस बघ ! कांहीं जर झालंच नाहीं तर तुला काय सांगायचं ?

**कमला** : नाहीं ना तुला सांगायचं ? नाहीं ना सांगत ? नाहींच सांगणार तूं ? मी तुझी बहीणच नव्हे ! ( डोळ्यांत पाणी आणते. )

**उत्तम** : हें काय ? ताई, तूं रडायला लागलीस ?

**कमला** : नव्हे ना मी तुझी बहीण ? दादा, तुझं दुःख तूं मला सांगणार नाहींस ! तूं दुःखी असणार अन् मी आनंदांत हंसूं खेळूं ? नव्हेच मी तुझी बहीण—

**उत्तम** : खरंच म्हटलं तर कांहीं झालं नाहीं ! पण काय असेल तें असो, सकाळपासून मला आपलं वाटतं कीं, आपल्यावर कांहीं तरी संकट खास येणार आहे !

**कमला** : असं वाटायला काय झालं कारण ?

**उत्तम** : काय तेंच कांहीं कळत नाहीं. पण सकाळीं माईनीं तसे उद्गार काढल्यापासून--

**कमला** : बोलल्या ना माई तुला ? म्हणूनच—म्हणूनच ! मग कुणीं बोललं नाहीं अन् कांहीं झालं नाहीं असं कसं म्हणालास ? काय म्हणाल्या माई ?

**उत्तम** : मला बाबूचं औषध आणायला उशीर झाला—( स्वगत ) तिथला प्रकार मला हिला कसा सांगतां येणार ? ( उघड ) उशीर झाला म्हणून संतापल्या आणि 'बाबू तुमच्या डोळ्यांत सलतो आहे, तुम्ही त्याला मारायला बसलां आहांत' ! असे काळीज भाजून टाकणारे शब्द त्यांनीं उच्चारले ! त्यावेळीं माईंची मुद्रा, केशवमामाचा कटाक्ष आणि प्रेमाबाईच्या पापणींतील पाणी हें जेव्हां मीं पाहिलं, तेव्हां, आपल्यावर आकाश कोसळून पडणार—आपल्या पायाखालीं भरून ठेवलेले सुरुंग आत्तांच उडणार—आपल्यावर दशदिशांनीं एकदम छापा येऊन पडणार, असं वाटून जीव आंतल्या आंत गुदमरूं लागला ! कांहीं केल्या मनाला स्वस्थताच येईना ! मनाची कशीही समजूत केली, तरी आपलं वाटतंच आहे, आपल्यावर कांहीं तरी संकट येणार !

**कमला** : एवढंच ना ? मग कांहीं विशेष नाहीं ! आपला अमृतमामा आहे, तो कांहीं आपल्यावर संकट येऊं द्यायचा नाहीं, ही नाहीं का तुझी खात्री ?—एवढ्या तेवढ्या गोष्टी तूं जिवाला लावून घेतोस, म्हणून असं होतं ? ( भय्यासाहेब येतो. )

**उत्तम** : तें खरं, पण माईनीं विनाकारण असं कां म्हणावं ? आम्हीं असं काय केलं आहे ?

**भय्या** : काय चालला आहे बहीणभावंडांचा विचार ? कुणीं काय केलं म्हणतोस ? छे बुवा, आज कांहीं तरी विशेष झालेलं दिसतं ! तुझा असा

उतरलेला चेहरा, निदान अमृतमामा इथं आल्यापासून तरी मीं कधीं पाहिला नाहीं ! मामा कुठं आहेत ?

**उत्तम :** मामा इतक्यांत येतील बाहेरून. सकाळपासून तुझी वाटच पाहात होते. बसवून घे, म्हणून सांगितलं आहे बाहेर जातांना !

**भय्या :** मामांची भेट घेतल्याशिवाय नाहीं जात–बरं, पण काय झालं तें नाहीं सांगितलंस ? मला सांगण्यासारखं नाहीं का ?

**उत्तम :** तुला न सांगायला काय झालं ? ताई, मी खिन्न झाल्याशिवाय कसा राहीन ?–माझ्या हृदयाचे तुकडे तुकडे झाल्याशिवाय कसे राहातील ? भय्यासाहेब, काय सांगूं तुला ?–एखादे वेळीं इतकं असह्य होतं, कीं पुन्हां घर सोडून जावं असंसुद्धां मनांत येतं !

**कमला :** तूं तसं म्हणतोस दादा, आणखी तुम्हां पुरुषांची गोष्ट निराळी असते. घर सोडावयाचं म्हटलं, तर तें तुम्हांला शक्य असतं; पण आम्हीं बायकांनीं रे काय करायचं–आम्हीं कसे हाल काढावयाचे ?

**भय्या :** पण माईसाहेब म्हणाल्या काय ?

**उत्तम :** त्या शब्दांचा पुनरुच्चार करायचा म्हणजे जिभेला जडपणा येतो, अंगांतली शक्ति कुठं तरी निघून जाते ! ते शब्द माझ्यानं आतां पुन्हां उच्चारवत नाहींत !

**भय्या :** ( कमलेस ) तूं सांग काय म्हणाल्या माई ?

**कमला :** ( स्वगत ) आतां मी काय सांगूं ? आणि कसं सांगूं ?

**उत्तम :** भय्यासाहेब, एखाद्या क्षुल्लक कारणावरून माईनीं म्हणावं काय, कीं ' माझा बाबू तुमच्या डोळ्यांत सलतो आहे, तुम्ही त्याला मारायला बसलां आहांत.' मला असं कधीं तरी वाटेल का ? त्या बालकाबद्दल अभद्र कल्पना मला शिवेल तरी कशी ? असं माईच्या मनांत कसं आलं नाहीं ? भय्यासाहेब, माईचे ते कर्णकटु शब्द माझ्या शरिराचा भडका करीत आहेत.

**भय्या :** सावत्रपणाच्या सत्रांत हें कांहींच म्हणण्यासारखं महत्त्वाचं नाहीं ?–तुझ्या डोळ्यांत माईचा बाबू सलत नसला तरी तूं माईच्या डोळ्यांत खुपूं नयेस, असं आहे का ?–अरे, चोराच्या मनांत चांदणं !

**उत्तम :** तें खरं. पण माझ्याबद्दल अशी शंका माईना कां यावी ? सावत्र झाला, तरी बाबू माझा भाऊ आहे ना ? भावाचं पाठबळ परमेश्वरानं पाठीशीं बांधलं असतां, क्रूरपणानं त्याचा अव्हेर कोण करील ? मग माईना अशी कुशंका कां यावी ?

**भय्या :** उत्तमा, तूं इतका बुद्धिमान् असतां, मला यावेळीं, तूं अगदीं वेडा आहेस, असं म्हणावं लागतं. आपल्या मुलाला वांटणीदार–त्यांतून तो सावत्रांतला असावा, असं कोणाला तरी वाटेल का ? तूं बाबूला पुढं कांहीं लाभूं देणार नाहींस, भाऊबंदकी माजेल, तूं सर्वस्व गिळंकृत करशील—

**उत्तम :** शिव शिव ! कोण ती अमंगळ कल्पना ! भय्यासाहेब, मी इतक्या हलक्या मनोवृत्तीचा आहें, अशी माईनीं कल्पना तरी कशी केली असेल ?

**कमला :** दादा, अशी कल्पना करणं काय कठीण आहे ? जगांत तरी काय असतं ? श्रीरामचंद्रासारखा सर्वगुणसंपन्न सावत्र मुलगा, आपल्या भरताकरितां कैकयीला नकोसा झाला नाहीं का दादा ? ध्रुवबाळासारखं गोजिरवाणं मूल, आपल्या बापाच्या मांडीवर कौतुकानें खेळायला गेलं असतां, तें सावत्रमातेच्या लाथेनं उलथून दिलं, तें तरी कां म्हणून ? मग दादा, तुझी गोष्ट कशाला ? तुम्ही आम्ही आजच्या काळांतलीं मुलं आहोंत !

**भय्या० :** ( स्वगत ) शाबास कमले तुझी ! आमच्या देशांतील माणसं सात्विक वृत्तीचं पोषण होण्याकरितां अशा रीतीनं आपलीं मनं तयार करीत असतात !

**कमला :** दादा, रामचंद्राला जें भोगावं लागलं, ध्रुवबाळाला ज्या वेदना सहन कराव्या लागल्या, त्याचा भाग तुझ्याहि वांटणीला आला आहे, तो नको का तुला उचलायला ?

**भय्या :** उत्तम, कमा म्हणते तें काय खोटं आहे ? कांहीं काळपर्यंत तरी सहन करायला नको का हें ?

**उत्तम :** पण मीं नाहीं म्हटलं आहे कुठं ?–आत्तांपर्यंत काय सहन केलं नाहीं ? आजकाल काय भोगीत नाहीं ? भय्यासाहेब, पुढंहि मला त्रास सहन केल्याशिवाय गत्यंतर नाहीं, हें मी जाणून आहें व त्याला माझी तयारी आहे; आणि म्हणूनच मला वाईट वाटतं. श्रीरामचंद्राचा आदर्श माझ्यापुढं आहे, ध्रुवबाळानं तयार केलेला राजमार्ग मला माहीत आहे, इतकंच नव्हे, तर महाभारताचा नायक जो भीष्म त्यानं आजन्म ब्रह्मचर्यव्रत आचरण्याची प्रतिज्ञा करून ती कां पाळली, हेंहि मी जाणतों. त्या पुराणप्रसिद्ध महाभागांची योग्यता जरी मला नसली, रामचंद्रासारखा वनवास भोगायला मी तयार नसलों, ध्रुवासारखी उग्र तपश्चर्या करण्याची धमक मला नसली, सावत्रभावाला आणि त्याच्या मुलाबाळांना त्रास होऊं नये म्हणून भीष्माप्रमाणं मी 'आजन्म ब्रह्मचर्यव्रत पाळीन' म्हणून प्रतिज्ञा जरी केली नाहीं, तरी माईच्या बाबूला–माझ्या भावाला–अण्णासाहेबांनीं

आपलं सर्वस्व द्यावं, मी त्यांतल्या एका कवडीलासुद्धां मन दाखविणार नाहीं, असं माईच्यासमोर कबूल करीन, हवं तर लिहून देईन! अफाट जग समोर आहे, मी माझ्या बुद्धिबळावर आणि मनगटाच्या शक्तीवर माझ्या आयुष्यांत कर्तबगारी करीन- ( अमृतमामा प्रवेश करतो. )

**अमृत** : थँक्स् ! थँक्स् ! थँक्स् ! चालूं दे-उत्तमा तुझा वाग्विहार असाच चालूं दे ! मी तुला त्याबद्दल थँक्स् देतों-चालूं दे, मी तुला थांबवीत नाहीं ! यावेळीं माझ्याऐवजीं माई किंवा केशवमामा आले असते, तर त्यांनीं मात्र तुला एकदम सबूर म्हणून सांगितलं असतं. निदान त्यांना वाटलं असतं, कीं उत्तम एखाद्या नाटकांतील जोरदार नक्कलच पाठ म्हणतो आहे !

**भय्या** : मुलांचीसुद्धां थट्टा करतां मामा ? उत्तम सांगत होता, त्यांत खोटं काय आहे ?

**अमृत** : मी कुठं खोटं आहे म्हणतों ? त्याची बुद्धिमत्ता चांगली आहे-तो हुशार आहे-बोलतो चांगला ! पुढं मागं बडा वक्ता होईल, पण अशी बेजबाबदार व्याख्यानाची पद्धति काय कामाची ?

**भय्या** : ( कोटाचा वरचा खिसा चांचपीत ) म्हणजे तुमचं म्हणणं काय, कीं होणाऱ्या छळाची दाद मागायला कुठं जागा नसली, तर मनाच्या समाधानाकरतां स्नेह्यांसोबत्यांजवळ बोलून, जड झालेलं अंतःकरण हलकं करायलासुद्धां मुलांनीं धजूं नये ?

**अमृत** : माझं म्हणणं ध्यानांत घेतलं नाहीं तुम्ही ! बोलायला चोरी असायचीच. अद्वातद्वा बडबडणाराला भाषणबंदीच्या कायद्याची माहिती नसावी काय ? बोलायला पाहिजेच ! पण त्या बोलण्याला शिस्त पाहिजे. शिस्तीच्या बोलण्याखेरीज तुमचं कोण ऐकणार ? खरं बोलायचं म्हणजे आमची प्रजा शरीराप्रमाणं मनानंहि कमकुवत झाली आहे. आमच्या प्रजेजवळ-अण्णासाहेबांच्या गृहराज्यांतल्या उत्तम-कमीजवळ- ( कमीला ) काय ग कमे, तूं अजून इथंच उभी ? आज भय्यासाहेबांना तुला पाहायला म्हणून मीं मुद्दाम बोलावून आणलं आणखीं तूं अजून इथंच ? तशी तुला ते नेहमीं पाहतातच. पण आज त्याच्याकरितां स्पेशल चहा तयार करून आणशील कीं नाहीं ? ( जायला निघते ) अग, हें बघ, भय्यासाहेबांना द्यायच्या कपावर 'लव्ह मी' अशीं अक्षरं आहेत कीं नाहीत नीट पाहून ठेव हं ! (ती लाजत जाते.) हं, मी काय म्हणत होतों भय्यासाहेब ! हं ! अण्णासाहेबांच्या

राज्यांत, माईच्या सत्तेखालीं, आमची प्रजा, बुद्धिमान आहे, होतकरू आहे, पण दुबळी आहे. चळवळ करण्याची धमक या प्रजेच्या अंगीं नाहीं! वास्तविक विचार केला असतां सनदशीर चळवळ करायला कोणती हरकत आहे? आमची प्रजा, दुसऱ्याच्या ओंजळीनं कोठवर पाणी पिणार? 'स्वयंनिर्णया'चं तत्त्व प्रस्थापित करण्याचा हक्क आहे, हें माहीत असतांना आणि दयाळू अण्णासाहेब–माईसाहेब यांच्या सारख्यांचा अंमल चालू असतांना, आमच्या प्रजेला भ्यायचं कारण काय?

**भय्या :** (हंसत, खिशाजवळ हात नेत) तुमच्या या विनोदी भाषेंतच उलट विचारायचं म्हणजे, माईच्या राज्यांत प्रजेला दाबांत ठेवण्याकरितां सुधारलेल्या शस्त्रांचा उपयोग चालू आहे, त्याला भ्याल्याशिवाय कसं चालणार?

**अमृत :** म्हणून शेवटपर्यंत निःशस्त्र प्रतिकाराची चळवळ थोडीच उपयोगी पडणार आहे! काय रे उत्तम, मी म्हणतों तें खरं कीं नाहीं?

**उत्तम :** (स्वगत) असं इन्डिरेक्टली सांगण्यांत मामांचा कांहीं हेतु आहे का! माझ्यावर कोसळणार असलेल्या संकटाचा सुगावा तर त्यांना लागला नसेल?

**अमृत :** अरे, बोलत कां नाहींस!–भय्यासाहेब, आमच्या प्रजेच्या अंगीं यावा तसा बोल्डनेस अजून आला नाहीं, हें खचित! अरे, ज्याचं त्यानं स्वतःच्या पायावर उभें राहण्याइतकी शक्ति दाखविली म्हणजे दुसरा चालतां येण्यासाठीं हात तरी देतो.

**उत्तम :** (स्वगत) खात्रीनं दग्याफटक्याची सूचना आहे ही!

**अमृत :** तें कांहीं नाहीं, भय्यासाहेब, या पांगळ्या प्रजेला आपणच पहिल्यांदां पुढं ओढलं पाहिजे. त्याशिवाय त्यांच्यांत अवसान यायचं नाहीं. आतां तुम्ही असं करा, आहे यांतली अर्धी प्रजा तुम्ही आपल्या राज्यांत सामील करून घ्या. कमलेला तुम्हीं आपलीशी केलीत–अरे हो, आलं का आपल्या वडिलांकडून पत्र–अण्णासाहेबांनीं परवां मला पुन्हां विचारलं त्याबद्दल?

**भय्या :** (पत्र काढून हातांत देत) आज दुसऱ्याच डिलिव्हरीला आलं!

**अमृत :** (पत्र हातीं घेऊन) अरे वा! पत्र हातीं पडतांच तुम्हीं धांवत आलां म्हणायचे!–यावरून मजकूर तर अनुकूल दिसतो आहे. तुमच्या विनंतीला वडिलांनीं कबुली दिली तर!–हेंच आहे ना पत्रांत?

**भय्या :** वाचा म्हणजे समजेल.

**अमृत :** (पत्र वाचीत) बरं, हुंड्याबद्दल कांहीं उल्लेख केला आहे काय? हो, तुम्हीं आहांत इनामदार लोक. आमचे अण्णासाहेब गरीब–

**भय्या** : हुंड्याकरितां वधूपक्षाला नाडून, जगाकडून 'ह्याच मुलाचा बाप' म्हणवून जगानं बोटं दाखवावींत, इतक्या कोत्या विचारांचे माझे वडील नाहींत.

**अमृत** : शाबास !–आनंद आहे !–या आनंदाच्या भरांत, माझी भाची जर सवत होणार नसती, तर माझ्या दोन मुलींपैकीं, एक आपल्याला खुषीनं देऊन, दुसरी तिच्यावर दक्षणा देण्याचं अभिवचन याच बैठकीला मीं दिलं असतं ! ( कमला चहाचे भरलेले कप घेऊन येते, तोंपर्यंत मामा पत्र वाचून संपवितो. ) ठीक, समजला मजकूर आपल्या पत्रांतला ! बरं, आतां आपला विचार काय ? स्पष्ट कळूं द्या, संकोच नको आहे–ही मुलगी तुमच्यासमोर उभी आहे ! हिला लिहितां वाचतां चांगलं येतं, तुम्हांला माहितच आहे–शिवाय मंडई चांगली करते, चार रुपये शेर बटाटे आणते–दहा रुपये तोळा साखर आणते–

**कमला** : ( लाजून ) मामांची आपली नेहमीं थट्टाच !

**अमृत** : हो !–ही वेळ आपल्या उभयतांच्या वाङ्‌निश्चयाची अतएव गंभीर आहे. यावेळीं गांभीर्यच पाहिजे !–थट्टा विनोद नाहीं कामाचा !– ( चहा पीत ) पण भय्यासाहेब, तुमच्या भावी वधूला चहा नाहीं साधला ! नाहीं ?–या अलीकडच्या बायकांना चहासुद्धां नीट करतां येत नाहीं आणि म्हणे पार्लमेंटांत या स्त्रियांना मताधिकार पाहिजे !–पण जाऊं द्या तें ! काय ठरविला विचार भय्यासाहेब तुम्हीं ?

**भय्या** : मी काय ठरविणार विचार ? बी. ए. झाल्याशिवाय या विवाहाच्या भानगडींत पडूं नये, एवढाच माझा विचार असला तर असायचा !

**अमृत** : हरिभाऊ आपट्यांची, 'पण लक्षांत कोण घेतो ?' कादंबरी अगदीं पाठ केलेली दिसते !–म्हणे बी. ए. झाल्याशिवाय भानगडींत पडायचं नाहीं ! 'बी ए.' चं अन् लग्नाचं कांहीं नातं आहे कीं काय ?—अहो, नाडलेल्या प्रजेला संकटांतून सोडवायचं, हा मुद्दा तुम्ही कसे विसरतां ?

**भय्या** : मामांच्या पुढं बोलण्याची सोयच रहात नाहीं !

**अमृत** : मग झालंच म्हणा कीं 'शुभ मंगल सावधान !' ( कमला लाजून उभी राहते. )

**उत्तम** : हें झालं मामा, पण पुढं कसं व्हायचं ? माईचा विचार ताई केशवमामांना द्यावी हा आहे, त्याचं काय करणार ? माई दुसऱ्याचं चालूं देणार नाहींत !

**अमृत** : अण्णासाहेबांच्या दरबारांत आजकाल माझं वजन कमी नाहीं कांहीं !

त्याची नको दुसऱ्याला काळजी ! माईसाहेब सत्ताधारी आहेत, केशवमामा सत्ता गाजवायला तयार आहेत, पण मी तुम्हां प्रजापक्षीयांचा पुढारी—हंसूं नका असे— तुम्हां लोकांचा कैवारी, या गृहराज्यांतल्या प्रजेचा हा 'लोकमान्य' आज अण्णासाहेबांच्या दरबारीं 'राजमान्य'हि आहे हें विसरूं नका ! लोकमान्यांची वाणी व प्रयत्न केव्हांहि अन्यथा होणार नाहींत ! (सर्व आनंदानें हंसतात, तोंच केशवमामा प्रवेश करतो.)

**केशव** : (मंडळी हंसतात तें न बघून) अमृतमामा, तुम्ही या मुलांतच मिसळलां आहांत का ?

**अमृत** : केशवमामा, मी मूलच आहें माझ्या आईबापाचं !

**केशव** : (त्रासिकपणानें) थट्टा राहूं द्या भलत्या वेळीं ! मी तुम्हांला विचारतों कीं, अण्णासाहेबांच्याजवळ कोणी आहे कीं नाहीं ? ते आजारी असतांना तुम्हांला त्यांच्याजवळ नुसतं बसायलासुद्धां होत नाहीं म्हणजे काय ? मला बाहेरचीं महत्वाचीं कामं असतात, तेव्हां माझी गोष्ट सोडून द्या, पण मी म्हणतों तुम्हीं आजाऱ्याजवळ कां असूं नये ? कमी इथं—उत्तमहि इथं; एकटी ताई काय काय म्हणून करील ? असं नका बुवा करीत जाऊं ! चला बरं, अण्णासाहेबांच्याजवळ जाऊन दोन घटका बसूं. उत्तम, औषध आणलंस का आजचं ? नसलंस तर आण जा बरं. (स्वगत) ठीक आहे. आज सावजें जाळ्यांत अडकताहेत का पाहूं या !

**अमृत** : चुकलं बुवा आमच्या हातून. क्षमा करा. निघालों मी अण्णासाहेबांकडे. आपल्यालाहि वेळ आहे का बसायला ? कीं सभा आहे कुठं ? भय्यासाहेब, या आतां ? उत्तम, औषध आण जा—कमे, अण्णासाहेबांना कांहीं खायला करायचं असेल तर कर जा. चला पाहूं केशवमामा— (जातात.)

---

## प्रवेश ६ वा

[**स्थळः**—अण्णासाहेबांचा दिवाणखाना. अण्णासाहेब गादीवर बसले आहेत, अमृतमामा शेजारच्या टेबलावरील मासिकें चाळीत आहे, माई एका बाजूस उद्योग करीत बसली आहे, केशवमामा इझी—चेअरवर वर्तमानपत्र वाचीत आहेत, असा पडदा उघडतो.

**अण्णा** : घरांतल्या मंडळींनीं गेल्या चार दोन दिवसांत काय कल्पना काढली आहे, कळली नाहीं तुला अमृत ? काल तूं घरीं जायला हवं असं माझ्याजवळ म्हणालास—कालच तुझ्या घरचं पत्र आलं आहे नाहीं का तुझं ?

**अमृत** : हो कालच आलं आणि म्हणूनच जायची गडबड करावी म्हणत होतों. येऊन बरेच दिवस झाले, तेव्हां थोडी काळजीच वाटायला लागली होती.

**माई** : ( सलगीच्या थट्टेनें ) घरीं जाण्याची कसली काळजी अमृतमामा ?

**अमृत** : नाहीं माई, लागला आहे यापेक्षां आणखीं जर अवधी लागला तर माझी बायको, सीध्या रीतीनं मला घरांत घेईल किंवा नाहीं, हीच काळजी, दुसरं काय ! चार कच्चीं बच्चीं आहेत घरीं ! बाकी, नाहीं गेलों आणखीं महिना दोन महिने तरी चालेल म्हणा !

**अण्णा** : नाहीं ना कांहीं तसं ?–मग झालं तर ! तुला बहुतेक जावं लागेल म्हणूनच आमच्या मंडळींनीं माझ्याजवळ विषय काढला होता !

**माई** : खरं सांगायचं, म्हणजे मामा आल्यापासून, आम्हांला फार बरं वाटलं ! आले, राहिले, मनमोकळेपणानं घरांत वागले; मला तर बाई भारीच बरं वाटलं मामा ! खरंच तुम्ही रहा ना महिना दोन महिने ? तुम्ही राहिल्यानें आम्हांला किती चांगलं वाटतं म्हणून सांगूं !

**अमृत** : ( स्वगत ) खात्रीनं मी इथून केव्हां निघून जाईन असं या बाईला झालं आहे ! [ उघड ] मलाहि इथं आलों तेव्हांपासून तुमच्या वर्तनानं एक दिवसहि माझ्या ताईची आठवण झाल्यावांचून राहिली नाहीं ! [ स्वगत ] दोघींच्या स्वभावांत किती तफावत म्हणून ! [ उघड ] शिवाय, केशवमामासारख्या थोर माणसाचा सहवासहि अनायासं लाभला ! मोठा मजा आला बुवा !

**माई** : आमचा केशव आहेच तसा मनमिळाऊ ! तो नेहमीं म्हणतो कीं अमृत-मामासारखा निर्मळ व गमत्या माणूस पहायलादेखील मिळायचा नाहीं !

**अमृत** : ( स्वगत ) स्तुतीचा मारा चालविला आहे माझ्यावर. पण चोराचीं पावलं चोरच हुडकून काढतो ! ( उघड ) केशवमामा ना ? चांगलेच कर्तबगार निघाले, समाजांत त्यांनीं आपलं वजन हलकं नाहीं ठेवलं ? शिवाय सरकार-दरबारांत चांगलंच वजन आहे. ( स्वगत ) पोलिसांत !

**केशव** : ( अमृताची खोटी स्तुति न समजून ) मामा, माझी पोझिशन् मला इतक्या लौकर वाढवितां येईल, याबद्दल माझी मलाच कल्पना नव्हती ! पण काय असेल तें असो, देशसेवेचं वारं माझ्या मनांत शिरलं आणि मीं प्रत्यक्ष कार्याला सुरवात केली मात्र, तों केव्हां यक्षिणीची कांडी फिरली आणि माझी पोझिशन् हां हां म्हणतां वाढली, मला कळलंहि नाहीं ! मी कार्य करूं लागलों, ‘ वसुधैव कुटुंबकम् ’ ही माझी वृत्ति बनली, आणि काय सांगूं मामा, ( स्वगत )

आतां बोलून बोलून चीत करतों या खेडवळाला! ( उघड ) जेव्हां मी विश्वकुटुंबी बनलों, तेव्हां मला माझ्या श्रमांचं कांहीं एक वाटेनासें झालं. माझ्या पॉकेटांतील हजार हजार रुपये सार्वजनिक संस्थांकडे 'देणग्या' म्हणून देतांना मला विशेषच आनंद होऊं लागला—

**अमृत** : ( स्वगत ) परभारें अण्णासाहेबांच्या तिजोरींतील रक्कम जायची–तुला कशाला वाईट वाटेल? ( उघड ) तेंच सांगतों ना मामा, पुढं मागं तुम्ही तुमच्या देशाचं खात्रीनं कल्याण करणार मामा!

**केशव** : ( हुरळून ) अशी तर माझी मनापासून इच्छा आहे–आमच्या लोकांच्या योग्य तक्रारी सरकारच्या कानावर घालून त्यांचं कल्याण मला करतां येईल, ही तर माझी उमेद आहे!

**अमृत** : स्तुत्य आहे–आपण थोडक्याच काळांत 'नामदारी' पटकावणार! हरकत नाहीं–आमच्या नात्यागोत्यांत 'नामदार' व्हायला पाहिजेच होतं कोणी तरी! असलं कांहीं आमच्या उत्तमानं करावं असं मला वाटे एके वेळीं! पण तसा कांहीं रंग दिसत नाहीं मामा त्याचा?

**माई** : नाहीं, आमचा उत्तम ना? केशवासारखा नाहींच व्हायचा तो!

**अमृत** : ( स्वगत ) आणि नकोच तो!

**माई** : मागंच केशवानं तें ओळखलं आहे, अन् म्हणूनच मी इकडच्या पाठीशीं लागलें होतें कीं, उत्तमाचे दिवस उगीच फुकट कशाला घालवायचे ते? स्वतःची प्रकृति अशी खालावत चाललेली–मधून मधून दुखणीं बहाणीं आहेतच, तेव्हां आपल्याच वशिल्यानं उत्तमाला द्यावा चिकटवून हपिसांत! तुम्ही आहांत इथं. उत्तमाची कसलीशी परीक्षा झालीच आहे. भाचा मिळवता झालेला तरी पहा एकदां!

**अण्णा** : आणखीं माझ्याहि मनानं असंच घेतलं आहे. मला कुठं होते आहे ही संसाराची दगदग! तेव्हां आमच्या साहेबांना देईन चिठी कीं, 'माझा मुलगा आहे, त्याला अन्नाला लावा.' त्याच्यावर टाकावं संसाराचं ओझं हलके हलके!

**अमृत** : ( चित्रमय जगत्‌चा अंक वाचीत असतां एकदम हंसतो.)

**अण्णा** : कां रे? हंसलास अमृत?

**अमृत** : या नोव्हेंबर १९१८ च्या चित्रमयजगत्‌च्या अंकांत 'आयुष्यांतील कर्तव्याची निवड' म्हणून एक लेख आला आहे, त्यांतील बोल्ड् टाइपांतील वाक्यें आणि लेखप्रसंगांतील विनोदी चित्रं पाहून मला हंसूं आलं!–दोन विचार एके वेळीं कसे जमतात, हेंहि माझ्या हंसण्याला दुसरं कारण होतंच!

**केशव** : काय आहे तो लेख ?—पाहूं द्या तरी ?

**अमृत** : ( अंक उघडून दाखवीत ) उपजीविकेच्या साधनांची व्यवस्थित सिद्धता करण्याचं सोडून, 'कारकुनीच्या' जागेसाठीं रस्त्यानं धांवपळ करणारांची ही अतोनात गर्दी—तसंच जन्मभर 'दिवाणगिरी' करणारा फर्डा म्हातारा, आणि भावी आयुष्यांत बडा शेट होणाऱ्या चपळ पोराची तागडी तोलण्याची ऐट—नोकरदाराचा मुलगा नोकरदारच झाला पाहिजे ! त्याखेरीज नोकरदारींत स्वतः अनुभवलेलं सुख मुलाला कसं समजणार ? महिन्याच्या पहिल्या तारखेला श्रीमंत, पंधरा तारखेला दरिद्री आणि महिन्याच्या शेवटीं पूर्ण कर्जबाजारी !—नोकरदारांशिवाय हा अनुभव कसा येणार ?—अण्णासाहेब, उत्तमाला जरूर नोकरीची चिठी द्या !

**माई** : पण मुलाचा विचार घेतला पाहिजे ना ?

**अमृत** : यांत मुलाचा विचार घेण्याचं कारणच नाहीं !—त्याला विचारलं, तर तो सांगेल, मला आपलं शिक्षण पुरं करायचं आहे. इथलं शिक्षण संपल्यावर, परदेशीं विद्या संपादनास जाण्याचा माझा बेत आहे. तुम्हीं नसलां मदत करीत, तर मी माझ्या मामाकडे जाईन. मामाकडे भाचा आला म्हणजे मामाला म्हणावं लागेल कीं, तूं आपलं शिक्षण कंप्लीट कर. तुला कोणाकडून सपोर्ट होत नसेल, तर मी तुझ्याकरतां 'ॐ भवती' करीन, पण तूं विलायतेला जा—तुझी बुद्धिमत्ता चांगली आहे ! तेव्हां नकोच, मुलाला विचारण्याच्या भानगडींत नकोच पडायला !—अण्णासाहेब, उत्तमाला द्याच साहेबांकडून नोकरी—

**अण्णा** : तुझा अभिप्राय अगदींच विरुद्ध पडला !—बरं आहे. मी आहें, तोंपर्यंत मीच भोगतों कष्ट झालं !

**केशव** : तुम्ही म्हणतां तितकं उत्तमाचं शिक्षणाकडे लक्ष दिसत नाहीं मामा !—मी पाहतों आहें ना अलीकडे ?—गेल्या महिन्यांत शाळेची पायरी चढलेला मीं उत्तमाला पाहिलं नाहीं !

**अण्णा** : अरे पण, उत्तमाच्या शाळेला सुट्टी आहे ना ?

**केशव** : ( स्वगत ) अरे हो, तें माझ्या ध्यानांत नाहीं ! माझीच फजिती झाली म्हणायची !

**माई** : कां असेना ? उत्तम शिकला तर तें आम्हांला नको का आहे ? त्याचं चांगलं व्हावं, असंच आपणांला करायचं !—तुम्हीं पहातांच मामा आल्यापासून ! मुलांना आम्ही वाईट नाहीं ना वागवीत ? मुलं दुसऱ्याचीं का आहेत ?—बरं

सांगा तुम्हीं मला. मीं मुलांना कधीं पांच बोटं लावलीं आहेत, का कधीं दाता-आड जीभ घातली आहे! आतां माणूस आहे, माणसाला राग आहे, बोलतंय रागाच्या भरांत माणूस एखादा शब्द–तुमची बहीण असती–मुलांची आई असती तर नसती का कधीं बोलली?

**अमृत :** छे छे, माई, तें का आम्हांला समजत नाहीं? मी आल्यापासून पाहतोंय ना रोज तेंच!

**माई :** तशीं म्हटलं तर आमचीं मुलं देखील देवगुणी. माझा शब्द कधीं खालीं पडूं देत नाहींत. नाहींतर जगांत मुलं आहेतच–सावत्रपणांतले प्रकार आपण जगांत काय थोडे पाहतों आणि ऐकतों? मी देवाजवळ सदा सर्वकाळ नवस करतें, तें एवढ्याचसाठीं बरं अमृतमामा, कीं देवा, माझ्या मनांत मुलांचं कांहीं वांकडं आणूं नकोस!

**अमृत :** (स्वगत) आज मुलांची देखील मनमुराद तारीफ चालविली आहे!

**अण्णा :** माझी औषध घेण्याची वेळ झाली आहे नाहीं? (घड्याळांत पाहून) हो झालीच. मुलगा विसरला काय?

**माई :** बसला असेल वाचण्याच्या नादांत–दुर्लक्ष झालं असेल–(आंत पाहून) उत्तम, अरे उत्तम–बाळ औषध द्यायची वेळ झाली आहे ना? (केशवाच्या कानाशीं) प्रेमाबाईनं सांगितलेलं नाटक याच वेळीं करूं या का? पण नको, आणखीं थोडा वेळ जाऊं दे. (उघड) आमचीं मुलं शहाणीं व्हावींत, त्यांचा नांवलौकिक व्हावा–धनदौलत त्यांनीं कमवावी, मुलंबाळं होऊन त्यांचा संसार सुखाचा व्हावा, असं आम्हांला वाटतं, नी तसं होण्याकरितां आम्हीं खटपटहि पण करतों!

**केशव :** माझी तर अशी इच्छा आहे कीं, उत्तमानं माझ्या खांद्याला खांदा भिडवून देशाकरतां कार्य करायला पुढं यावं–मी जसं करतों–

**अमृत :** (स्वगत) परमेश्वरा, उत्तमाच्या हातून याच्यासारखं कांहीं होऊं देऊं नकोस! (उघड) तें खरं आहे, मामा, तें खरंच आहे!

(उत्तम येतो.)

**माई :** अरे औषध द्यायचं आहे ना? वेळ झाली आहे!

**उत्तम :** नाहीं, आजचे भाग चार चार तासांच्या अंतरानं द्यायचे असं सांगितलं आहे डॉक्टरांनीं.

**अमृत :** आतां ताप किती आहे पहा बरं? (उत्तम अण्णासाहेबांना थर्मामिटर

लावायला देतो.) अरे, अण्णासाहेबांच्या जवळ थोडं बसावं—असं परक्याप्रमाणं काय करतोस? जवळ बसून पाय चेपावेत, थोडी कंबर चेपावी, गडीमाणसं असलीं म्हणून काय झालं? स्वतःच्या हातानं वडिलांची सेवा केली तर काय बिघडेल? बैस तिथं. (उत्तम अण्णासाहेबांच्या जवळ बसतो.) (स्वगत) माईच्या चेहऱ्यावरून तिच्या मनाची सारखी चलबिचल चाललेली दिसते! मुलांच्या बंदोबस्ताच्या तयारींत आहेत! असंच असलं पाहिजे. त्याशिवाय अशी लाघवी भाषा सुरू नाहीं व्हायची! दुष्टांची जिव्हा अमृतासारखी भाषा बोलूं लागली कीं समजावं, मागून हालाहलाचा प्रयोग होणार! सावध आहे मी म्हणावं!

**माई** : (केशवाच्या कानांत हलकेच) अजून कांहीं मेलं जुळेना मनासारखं! या मेल्याचा ठाव सांपडत नाहीं! मेला बोलतोय गोड, पण त्यावर फसून उपयोगी नाहीं! सावधगिरीनंच काय करायचं तें करायला हवं—आपलं पहिलं तर हुकविलंच! जाऊं दे, कारटं असं नाहीं, तर तसं मरेल! पण त्या कारटीची व्यवस्था तर माझ्या मनासारखी होईल? (उघड) बरं कमीच्या लग्नाचं काय करतां मामा? हें मी तुम्हांला विचारणार होतें!

**अमृत** : (स्वगत) इकडे वळला का मोर्चा आतां?—असो. (उघड) कमीच्या लग्नाचं मी काय करणार?—तुम्ही तिच्या आईच्या ठिकाणीं आहांत—अण्णासाहेब वडील आहेत—

**माई** : माझ्या मनांतून होतं यंदांच तिला पिवळी करायची!

**अमृत** : तसं असेल तर चांगलंच झालं!—तुमची तयारी असल्यावर नवरा मुलगा एका पायावर तयार आहे!

**केशव** : (स्वगत आनंदानें) अस्सं—तुझी भाची माझी बायको तर होऊं दे; मग सांगेन कसं काय आहे तें!

**माई** : मी तेंच म्हणत होतें—तुमच्या बरं लक्षांत आलं!—तुम्हांला पसंत आहे ना नवरा मुलगा?—कमीचा अन् त्याचा जोडा चांगला शोभेल ना?

**अमृत** : उत्कृष्ट! अगदीं—लक्ष्मीनारायणासारखा!

**माई** : होय ना?—बरं झालं बाई!—मग काय ठरवायचं म्हणतां?

**अमृत** : ठरवायचं म्हणजे?—मी केव्हांपासून त्याच खटपटींत आहें. मागंच नाहीं का अण्णासाहेबांना सुचवून ठेवलं? कबूल असल्याचं त्यांचं काल पत्र देखील आलं!

**केशव** : —(स्वगत) ऑं! म्हणजे?

**माई** : कुणाचं पत्र ?

**अमृत** : पत्र ! भय्यासाहेबांच्या वडिलांचं—कबूल आहेत ते कमळीला करून घ्यायला. ( माई, केशव खजील होतात. )

**केशव** : ( स्वगत ) अरे चोरा ! असा डाव मांडलास काय ?

**माई** : ( स्वगत ) पहा ग बाई कसा पाताळयंत्री आहे मेला !—मला वाटलं आमचा केशवच पसंत पडला याला !

**अण्णा** : काय म्हणतोस, भय्यासाहेबांच्या वडीलांचं—तात्यासाहेब इनामदारांचं पत्र कमीला करून घेऊं म्हणून आलं ?—म्हणजे चांगलंच झालं म्हणायचं ?

**माई** : ( स्वगत ) इकडे तर शुद्ध सांभ असायचं !—चट्दिशीं वळले आपले !—पण मीं ऐकलं पाहिजे ना ? [ उघड ] तें स्थळ जमलं तर कांहीं वाईट नाहीं—पण मी म्हणत होतें, कीं काळादुष्काळाचे दिवस, इनामदारांचं स्थळ म्हणजे हुंड्यांचं असायचं, आणि आम्ही रोजगारदार माणसं; आम्हांला तें स्थळ कसं झेपेल !

**अमृत** : नाहीं. माई, त्यांची हुंड्याची मुळींच अट नाहीं. ते हुंड्याच्या पूर्ण विरुद्ध आहेत !

**माई** : पण आपला केशव काय वाईट होता ? घरांतल्या घरांत झालं असतं ?

**केशव** : ( स्वगत ) मीं मुळीं त्या कारटीशीं लग्नच करणार नाहीं !

**माई** : केशव—कमीचा जोडा जुळत नाहीं का ?

**अमृत** : अशी थट्टा करतां काय माई आमची ? अहो, केशवराव कुणीकडे, अन् कमळी ती काय ? असली अळणी मुलगी केशवरावासारख्या तडफीच्या माणसाला ? अं हंः ! उद्यां केशवमामा होणार आहेत 'नामदार' आणि नामदाराला आमच्या कमीसारखी बावळट बायको ? हं नकोच तें ! कमी बायको झाली तर केशवमामांच्या जन्माचं मातेरं व्हायचं ! शिवाय दुसरी एक गोष्ट सांगतों, हूं म्हणून ऐकून घ्या तुम्ही ! कसं झालं तरी तुम्ही पडलांत कमीची सावत्र आई. त्यांत होणार नणंद, मग तुम्ही कांहीं बोललां, तरी जग म्हणायचं पहा, मुलीला कसा दुहेरी जाच चालवला आहे माईनीं—तेव्हां नकोच ! तुमच्या जिवाला त्रास ! म्हणतों हें खरं आहे कीं नाहीं ?

**माई** : ( स्वगत संतापून दांतओंठ चावीत ) खरं आहे कीं नाहीं सांगेन अं ?—माझेच दांत माझ्याच घशांत घातलेस अं ? ( अंग थरारून ) मला अगदीं रडायला होईल असं झालं आहे. पण इथून उगीचच्या उगीच उठूं तरी कशी !

( विचार ) अगबाई, बाबू रडायला लागला वाटतं. त्याला घेतलं पाहिजे. ( जातां जातां स्वगत ) आतां असेंच ! ( जातांना केशवला कांहीं खूण करते. )

**अमृत** : ( स्वगत ) अरेरे !–मी या वेळीं फोटोग्राफर नाहीं म्हणून मला किती वाईट वाटत आहे ! या वेळीं किती लोकांचे चेहेरे फोटो काढण्यालायक होते.

**केशव** : ( स्वगत ) त्या कारट्यांना या अमृत्याच्या पाठीचा आश्रय मिळाला आहे काय ? ठीक आहे–'इंद्राय तक्षकाय स्वाहाः' असंच आतां करतों.[इतक्यांत पडद्यांत ] " उत्तम, अरे उत्तम, औषध नाहीं का न्यायचं ?–घेऊन जा बरं अगोदर तें औषध–" [ उत्तम घड्याळांत पाहतो आणि औषध आणण्यास जातो व लगेच औषध घेऊन येतो. ]

**अण्णा** : आतां कांहीं तितकीशी औषधाची जरूरी भासत नाहीं. तसा कांहीं ताप फारसा नसतो. नॉर्मल टेंपरेंचरच असतें–( उत्तमानें औषधाचा प्याला दिलेला तोंडाला लावतो ) डॉक्टरांचं हें पाणी किती कडू असतं. अरे खडी-साखर आणली आहेस ना ? [ उत्तम हातांत खडीसाखर देतो. ] औषधावर खडी-साखर तोंडांत टाकली तरी दिवसाचा दिवस तोंडाचा कडवटपणा कांहीं जात नाहीं ! पण औषध असतें परिणामीं हितकर म्हणून घेतलंच पाहिजे. (तोंडाला लावून घोट घेणार तोंच पेल्याकडे केशवमामांचें लक्ष जातें व तो लगेच उठून अण्णा-साहेबांच्या हातचा पेला काढून घेतो. ) थांबा अण्णासाहेब, औषध घेऊं नका !

**अण्णा** : कां ?–कां घेऊं नको ? ( अमृत, उत्तम व अण्णासाहेब साश्चर्य पाहतात. )

**केशव** : कां म्हणजे ?–माझं सहज लक्ष गेलं म्हणून बरं झालं ?–नाहीं तर भलत्याच थराला गोष्ट गेली असती !

**अण्णा** : ( गोंधळून ) अहो, पण झालं काय ?

**केशव** : हातांतला प्याला नीट पाहा. भलत्याच प्याल्यांतून औषध आणलं आहे; म्हणून म्हणतों.

**अमृत** : मग झालं काय ?

**केशव** : दुसरं काय व्हायचं ? ह्या पेल्यांत विषारी पाणी ठेवलं होतं. त्यांतच औषध ओतलं वाटतं त्यानं ! [ उत्तमास ] काय रे, औषध ओततांना प्याल्यांत कांहीं आहे नाहीं पाहिलं होतेंस का ?

**उत्तम** : [ गांगरून ] नाहीं

**केशव** : पहा, तरी मला वाटलंच ! त्या प्रेमाबाईनें कसलेंसें विषारी औषध करण्याकरितां या पेल्यांत कांहींसं घातलं होतं, हें मी पाहिलं होतं म्हणून बरं झालं !

**अण्णा** : म्हणजे, या औषधांत वीष मिसळलं गेलं कीं काय ?

**केशव** : होय ! अण्णासाहेब, आपल्या प्राणावरच बेतली होती !–नाहीं का अमृतमामा ?

**अमृत** : उघडच आहे ! ( स्वगत ) असं वीष बाहेर आणलं काय ? तरी मला वाटलंच होतं–तरी पण माई, तूं माई आहेस ! स्वतःवर बाजू न येतां मुलांचा नायनाट करण्याची काय अजब युक्ति लढविली आहे पण माईनं ? पण माई, मी पण मामाच आहे बरं का ?–तुम्हीं सुरुंग लावला आहे खरा, पण तुमच्याहि सुरुंगाखालीं माझा दोन हात सुरुंग भरून ठेवला आहे हें विसरूं नका !–ठीक आहे, आतां आपणहि यांना नाचवूं या थोडा वेळ. कुठपर्यंत यांची मजल जाते ती पाहूं ! [ उघड–अंगावर शहारे आणून. ] छे, छे, छे, आज अगदीं अनर्थ टळला ! काय मुलगा मूर्ख आहे !

**अण्णा** : [ संतापून ] पहा अमृत, असलं हें कारटं घांद्रट आहे ! आज आपल्या जन्मदात्याच्या जिवावर उठलं होतं कीं नाहीं ?

**केशव** : तसं म्हणूं नका अण्णासाहेब ! त्याची नजरचूक झाली आहे, ही गोष्ट खरी ! त्यांत त्यानं हेतुपुरःसर केलं नाहीं. ( स्वगत ) असंच धोरण स्वीकारलं पाहिजे या वेळीं ! कसा बेटा जाळ्यांत अडकला आहे आतां ! कर म्हणावं आतां किती धडपड करतोस ती ! ( उघड ) असा मूर्खपणा उत्तमाच्या हातून जरी बरा नव्हे तरी—

**अमृत** : बरा नव्हे काय ?–अगदीं वाईट. अत्यंत निंद्य म्हणा ! दुष्टपणानं एखाद्याला वीष पाजलं काय किंवा मूर्खपणानं पाजलं काय, वीष आपलं कार्य करणारच ! मूर्खपणानं न जाणतां उपयोग झाला आहे म्हणून वीष कांहीं आपला स्वभावधर्म सोडणार नाहीं ! विषाचं अमृत होत नसतं !–( खोट्या रागाचा पारा चढवीत ) काय रे उत्तम, केवढा हा मूर्खपणा केला होतास ? तुझ्या मूर्खपणामुळं आज केवढा अनर्थ ओढवला असता याची तुला कल्पना तरी आहे काय ? ( गडबड ऐकून माई आंतून घाईघाईनें येते. )

**माई** : काय झालं ? काय झालं ? अमृतमामा रागावले आहेत कां ?

**केशव** : ( माईस एकीकडे ) आपला नेम असा अचूक लागला आहे म्हणतेस ?

**माई :** ( अमृतास ) अमृतमामा, काय झालं आहे पण ? आपण इतके संतापला आहांत कां ? उत्तम कां रडतो आहे ? काय झालं ?

**अमृत :** आणखी काय व्हायचं राहिलं होतं ! या मुलाच्या मूर्खपणामुळं आज अण्णासाहेबांचा लाखाचा प्राण हें जग सोडून गेला असता. विषाच्या प्याल्यांत यानं अण्णासाहेबांचं औषध आणलं ?

**माई :** ( घाबरून ) अग बाई, म्हणजे ? असं कसं झालं ? देव बऱ्यावरच होता म्हणायचा ! 'काळ आला होता पण वेळ आली नव्हती' म्हणतात, तसं झालं ! देवा, आज तूं माझं सौभाग्य राखलंस ?

**अमृत :** ( स्वगत ) वा, वा माई-जणूं कांहीं तुला यांतलं कांहींच माहीत नाहीं अं ! तुमच्या काडीवर उभारलेल्या माडीचा हा डोलारा फू करून उडविण्याची मीं अगोदरच व्यवस्था करून ठेविली आहे, तेव्हां तुम्हांला असेंच चढाविलें पाहिजे. तुम्हीं पुरते चढलां म्हणजे तुम्हांला यथास्थित पाडतां येईल !

**माई :** अमृतमामा, तुम्हीं बोलतां बोलतां बंद कां झालां ? अहो, देवानेंच संकट टाळलं ! आतां काय त्याचं ? आतां राग शांत करा ! उत्तम, जा पाहूं देवघरांत. देवाला नमस्कार कर आणि थोडा वेळ स्वस्थ बैस जा.

( तो जाऊं लागतो. )

**अमृत :** ( खोट्या रागानेंच ) जातोस कुठं ? थांब, माई, माझा राग आतां तसा शांत व्हायचा नाहीं ! याच्या मूर्खपणाचं प्रायाश्चित्त याला दिलंच पाहिजे ! मूर्खपणानं का होईना पण बापाला वीष पाजण्याचं पाप करणाऱ्याला कोणतं प्रायश्चित्त द्यावं याचा मी विचार करीत होतों. अण्णासाहेब, उत्तम तुमचा मुलगा आहे, माझा भाचा आहे. त्याच्या अपराधाचें प्रायाश्चित्त मी त्याला अगदीं कडक देणार आहें, तेव्हां आपण मध्यें पडूं नका. असल्या मूर्ख मुलाचं या जगांत काय काम आहे ? या त्याच्या मूर्खपणाच्या अपराधाचे परिणाम कुठपर्यंत जाऊन पोंचले असते तें पाहा. त्यानं न जाणतां जरी हें केलं तरी जगांत विपर्यास कसा झाला असता ? तो स्वतः फांसावर लटकला गेला असता—मी त्याचा कैवारी पाठीराखा म्हणून त्याची बाधा माझ्यापर्यंत येऊन पोंचली असती ! भाच्याच्या कल्याणासाठीं बापाला मारून टाकण्याचा गुरुमंत्र मीं दिला असं माझ्यावर आलं असतं—आणि याबद्दल मला जन्मठेप काळं पाणी पहावं लागलं असतं ! अण्णासाहेब, तुमच्या मुलाच्या या अक्षम्य अपराधाबद्दल मी त्याला तुमच्या देखत शिक्षा करीत आहें. उत्तम, जो विषाचा प्याला अण्णासाहेबांच्या पोटांत तुझ्या हलगर्जीपणामुळें जात

होता, तोच प्याला तूं घे-घे तो, त्याशिवाय माझा संताप शमणार नाहीं ! तुझ्या-सारखा नालायक मुलगा जगांत जगून उपयोग नाहीं. घे म्हणतों ना ? टाक पिऊन. ( पेला उचलून त्याच्याजवळ नेतो. अण्णासाहेब खरोखरच घाबरतात )

**अण्णा :** हं, हं, हं, हं, अमृत हें काय ? हा कसला राग ?

**माई व केशव :** अहो, असला कसला भलताच राग ! मागें सरा-शांत व्हा ! ( एकमेकांच्या कानाशीं ) असंच व्हायला पाहिजे होतं नाहीं ? छान झालें. त्यांच्याच हातानें त्यांचा कांटा उपटतो आहे; ठीक झालं ! ( उघड ) अमृतमामा, असा काय अविचार करतां ?

**अमृत :** माझा राग असा शांत व्हायचा नाहीं ! हा प्याला त्यानं घेतला पाहिजे; नाहीं तर मी पिऊन टाकतों ! मला अडथळा कोण करील ? भाच्याच्या अपराधाचें प्रायश्चित्त मामाला मिळालंच पाहिजे ! हा प्याला मीच पिऊन टाकणार !

**अण्णा:** ( घाबरून ) भलतंच कांहीं तरी ! अमृत, हा कसला तुझा आततायी-पणा ! हें वीष त्याला पाजूं नकोस आणि तूंहि पिऊं नकोस; अशा वागण्याला काय शहाणपणा म्हणतात-

**अमृत:** अण्णासाहेब, मला नका अडवूं !-हा प्याला, या पेल्यांतील वीष मी पिणार ! ( स्वगत ) या पेल्यांत वीष आहे कुठं म्हणा ! काय या बहिण-भावंडांना आनंद झाला आहे पण मी हें वीष पिणार म्हणून ! अगदीं आंतल्या आंत गुदगुल्या होत आहेत ! ( उघड ) अण्णासाहेब, तुम्हीं हलूं नका जाग्यावरून ! केशवमामा, तुम्हीं मला आवरण्याच्या भानगडींत पडूं नका ! या विषाचा परिणाम माझ्यावर कांहीं व्हायचा नाहीं. या विषाचें मी अमृत करीन ! ( प्याला तोंडाला लावून पिण्याचें सोंग करतो. )

**अण्णा:** ( घाबरून ) शाळिग्राम-शाळिग्राम, अरे या अमृताला आवर रे ! ( शाळिग्राम प्रवेश करतो ) अरे अमृताला आवर, तो विषाचा प्याला पितो आहे !

**शाळिग्राम :** ( अमृताचा हात धरून ) कुठला विषाचा प्याला ? थांबा मामा.

**अमृत :** अरे कुठला म्हणजे ? त्या प्रेमाबाईनीं कसलंसं औषध तयार करण्या-करितां या प्याल्यांत विषारी पाणी नव्हतं का ठेविलं ? त्याच प्याल्यांत उत्तमानं अण्णासाहेबांचं औषध ओतलं !

**शाळिग्राम:** तो टेबलावरचा प्याला ना ! अहो, मामा तो प्याला प्रेमाबाईकडे पोंचता करायला तुम्हींच नाहीं का कमीला सांगितलं ? मग तो प्याला इथं कसा राहील ?

**अमृत** : ( आठवल्यासारखें करून ) हो खरंच, मीं सांगितलं होतं खरं ! अण्णा-साहेब, मीं कमीला सांगितलं होतं. माई, आतां आठवलं मला, मीं कमीला बजावलं होतं तें. केशवमामा—मी विसरलों होतों. ( केशव व माई खजील होतात. ) हो, पण मीं सांगितलं पण कमीनं नेला कीं नाहीं कोण जाणें ! कमी कुठं आहे !

**शाळिग्राम**: ती तिकडेच गेली आहे. ही पहा आलीच ( कमळा येते ) काय ग कमे, मामांनीं तो प्याला पोंचता करायला सांगितला होता तो प्रेमाबाईकडे पोंचता केलास का ?

**कमळा** : हो—मी केव्हांच घेऊन गेलें. त्यांनीं तें औषध तयार केलं देखील. तयार करून मलाच त्यांनीं तें नेन्यांच्या वेणीकडे पोंचतें करायला सांगितलें; मींच तें पोंचतं केलं. म्हणून वेळ झाला मला यायला !

**अण्णा**: ठीक झालं !

**माई** : बरं झालं बाई !

**केशव** : सुटलों एकदांचे !

**शाळिग्राम**: घोटाळे झाले पण उलगडले म्हणायचे !

**उत्तम** : ( स्वगत ) ईश्वरा, तूंच या तुफानांतून मामांच्या रूपानें येऊन वांचविलंस !

**कमळा** : ( उत्तमास ) काय झालं रे !

**उत्तम** : मग सांगेन काय झालं तें !

**माई** : कांहीं असो. आलेली वेळ गेली; चहाच्या कपांतील वादळच ठरलें—सर्वांनाच आनंद झाला, हें बरीक खरं !

**अमृत** : ( हंसत स्वगत ) हें बरीक खरं ! कोणाला आनंद झाला, व्यूह केला तरी सुटलों म्हणून; आणि कोणाला आनंद झाला व्यूह ढांसळवितां आला म्हणून ! ( उघड ) बरं आहे, माई, ईशकृपेनं सगळंच चहाच्या कपांतील वादळ झालं, ही आनंदाची गोष्ट आहे. सर्वांना त्रास मात्र निष्कारण झाला ! अण्णासाहेब, आतां थोडी विश्रांती घ्या ! माई, आम्हांला आतां गरम गरम चहा द्या म्हणजे सर्व श्रम जातील ! ( सर्व जातात. )

---

# अंक ३ रा



## प्रवेश १ ला

[ **स्थळः**—अण्णासाहेबांचें घर. पात्रेंः—भय्यासाहेब व कमला. ]

**भय्या :** कां ? लपंडावाचा खेळ चालला आहे वाटतं ? माईच्या, केशवमामांच्या, प्रेमाबाईच्या, अजून कोणीच हातांत लागला नाहीं वाटतं ? जपून हं, पटकन् येऊन कोणीतरी पकडील ? का तुमच्याकडेच शोधायची पाळी आली आहे ? डाव जिंकणार कोण ?

**कमला :** डाव जिंकला म्हणजे मग पहायचं कोण जिंकणार तें ? सध्यां खेळाला तर खूप रंग आला आहे, पण लपलंय् कोण अन् शोधतंय कोण तेंच कळेना.

**भय्या :** लपालपी करायचं कारण अमृतमामांना कांहीं नाहीं. विषाच्या फासापासून माईनाच लपून बसायची पाळी आली असेल ? डाव जिंकणार ते अमृतमामा यांत तर शंकाच नाहीं. आतां कोणाच्या शोधांत आहेस ? उत्तम कुणाला पाहतो आहे, अमृतमामा कुणावर पालत आहे, तें कळूं दे तर खरं ?

**कमला :** हळू हळू बोलायचं, माईनीं ऐकलं तर आकाशपाताळ एक व्हायचं ! त्या आधींच चिडल्या आहेत त्या दिवसापासून घरांत सगळयांवर ! त्यांत त्यांच्या मर्जीविरुद्ध झालेलं-त्यांत आणखीं फोडणी नको.

**भय्या :** फोडणीशिवाय खमंगाई कशी येणार ? मी त्या दिवशीं कसा चुकलों ? बरं मला कुणी बोलावणंहि पाठविलं नाहीं. माईची फजिती झालेली, केशवमामा ओशाळलेला, प्रेमाबाईनं तोंड वेडंवाकड केलेलं मला एकदां पहायचं होतं, अमृतमामा मला बोलवायचं कसे विसरले ? कशी एक जात फजीती झाली माईची ?

**कमला :** नांव तरी घेऊं नये कुणाचं ? तुम्हांला काय होतंय ! आम्हांला बोलणीं सोसावीं लागतात ! आम्हांला बोलणीं झालेलीं बरीं वाटत असलीं, तर मग खुशाल चालूं द्यावं, माझं कांहीं एक म्हणणं नाहीं.

**भय्या :** आतां माईची पर्वा करण्याचं कांहीं एक कारण नाहीं—अमृतमामा खंबीर भेटले आहेत.

**कमला** : असं म्हणून कसं चालेल? मामा बोलतो माईंना, माई काढतात त्याचं सारं उट्टं आमच्यावर! अजून आम्ही माईंच्याच हाताखालीं आहोंत म्हटलं?

**भय्या** : म्हणजे? माईंचीं इतकीं कारस्थानं चव्हाट्यावर आणलीं असतां माईंना तूं पूर्वींसारखीच अजून भितेस?

**कमला** : न भिऊन कसं चालणार?

**भय्या** : (हंसत) मग काय? माईंच्या हाताखालून सुटल्याशिवाय माईंची दहशत सुटायची नाहीं म्हणतेस? आले आहेत–तेही दिवस जवळ आले आहेत!

**कमला** : होय, पण ते दिवस पाहायला मिळेपर्यंत तर भ्यालं पाहिजे. बाकी तितकी पहिल्यासारखी मी माईंना भीत नाहीं म्हणा. अमृतमामा जवळपास कुठं असला, दादा आजूबाजूला हिंडत असला, (त्याच्याकडे पहात) आणखीं कुणी धीर द्यायला जवळ असलं म्हणजे मग माईंची नाहीं भीति वाटत?

**भय्या** : मग काय माईंची भीति वाटत नाहीं म्हणतेस? (स्वगत) थोडी मौज करून पाहूं या. (दूर पाहून) अरे बापरे! माई इकडेच आल्या वाटतं! आतां?

**कमला** : (घाबरून) अगबाई, माई! कुठं आहेत? त्यांनीं आपल्याला पाहिलं वाटतं?

**भय्या** : (हंसत) नाहीं, माई आल्या नाहींत. मला नुसता भास झाला–पण किती भ्यालीस तूं? मी जवळ असतांना माईंना भ्यायला काय झालं असं आतांच म्हणालीस ना? आणि किती भ्यालीस?

**कमला** : अशी भलतीच थट्टा करायची बरी सुचते? माझ्या काळजाचं पाणी झालं की? असा निर्दय विनोद करायचा कसा सुचतो पुरुषांना, तें त्यांचं त्यांनांच माहीत?

**भय्या** : माईंचं नांव काढतांच कशी दचकत होतीस तें पुढच्या आयुष्यांत लक्षांत राहाण्यासाठीं मीं मौज केली. मोठेपणीं आपणांला असं करतां येईल का? लहानपणची ही आनंदाची आठवण–'बाळपणींचा काळ सुखाचा' असं आपण पुढं म्हणूं, तेव्हां आपल्याला किती तरी मौज वाटेल?–नाहीं का?

**कमला** : हें मात्र खरं! मोठेपणीं आम्हांला, आम्हां पोरक्या मुलांना–सावत्र आईच्या राज्यांत वाढलेल्या जिवांना–'बाळपणींचा काळ सुखाचा' असं फारसं–नव्हे मुळींच–वाटायचं कारण नसतं. बाळपणाचा साराच काळ असा गेलेला असायचा कीं त्याची आठवण जितकी न होईल तितकी चांगली, असं वाटायचं, तें तसं अगदींच होऊं नये म्हणून, आतांच्यासारखी एखादी गोड आठवण तरी असावी म्हणून थट्टा झाली, हें मात्र खरं!

**भय्या :** चतुर आहेस तूं ! उत्तमाची बहीण शोभतेस खरी ! लहानपणाची ही आनंदाची आठवण मी केव्हांहि विसरणार नाहीं. बरं, आतां उत्तमाची गांठ केव्हां पडायची ? कुठें गेला आहे तो ? मीं आतां येईन म्हणून त्याला सांगितलं होतं— (उत्तम येतो)

**उत्तम :** आणि तें माझ्या लक्षांत होतं—

**कमला :** मग इतका वेळ कुठं होतास ? इकडं कां आला नाहींस ?...

**उत्तम :** भय्याला आल्याबरोबर मीं पाहिलं, पण तो येतांच तूं त्याला सामोरी गेलीस. मग मी कशाला येऊं तुमच्या दोघांच्यामध्यें ?–तुम्हांला बोलायला थोडी तरी सवड पाहिजे ? अशी बोलायची संधि. आली असतां, मध्येंच माझ्या-सारख्यानं यायचं म्हणजे वाघाच्या तोंडांतला घांस काढून घेण्याइतकंच तें कठीण !

**भय्या :** तें चांगलं केलंस, नाहींतर तुमच्या घराच्या सध्यांच्या लपंडावाच्या खेळांत अशी संधी मला कधीं येणार होती ? मध्येंच आला नाहींस, चांगलं केलंस ! पण मला वाटतं लपंडाव खेळतांना तूं केशवमामांना चुकवितां चुकवितां इकडं आला असशील ? केशवमामाच तुला शोधतात ना ?—

**उत्तम :** मला शोधायची केशवममांना तितकीशी जरूर नाहीं, पण तुला मात्र शोधीत येतील !–सांभाळ बरं का भय्यासाहेब, प्रथमच सांगून ठेवतों, होतां होईतों तूं केशवमामांना सांपडला नाहींस तरच बरं !—

**कमला :** (न समजून) कां ? असं कां म्हणतोस दादा ?—

**उत्तम :** केशवमामांचा केवढा अक्षम्य अपराध भय्यासाहेबानं केला आहे माहीत नाहीं तुला ताई ?–भय्यासाहेब, सांभाळ हं, मामांच्या जर कां हातीं लागलास आणि तोहि असा ताईशीं बोलत उभा असतांना, तर काय होईल तें कांहीं सांगवत नाहीं. सापाच्या शेंपटीवर पाय देऊन त्याला चिडवला आहेस–जेवायला बसवून, ब्राह्मणाला पाटावरून मध्येंच उठवला आहेस !—

**कमला :** (लाजून) इश्श, दादालासुद्धां थट्टा करायला यायला लागली !

**भय्या :** खरोखरच मग तुझ्या केशवमामाला भ्यालं पाहिजे ! ठीक आहे तर. तेवढ्या मानावरच जर ते खूष होत असले तर बरंच. उद्यांपासून हा नियम मी अमलांत आणणार !

**उत्तम :** आणि आज ! आज रोख उद्यां उधार लिहून ठेवण्यासारखं बोलतोस तूं.

**भय्या :** तर काय योग्यतेपेक्षां ज्यास्तच भ्यालं पाहिजे म्हणतोस ! छट् ! हें नाहीं आपल्याला पसंत ! ज्याच्या त्याच्या योग्यतेप्रमाणें ज्याला त्याला मान

द्यावा या मताचा मी आहें. आजकाल खरोखर आपल्याला ज्या गोष्टी त्रासाच्या वाटत असतील त्या उद्यांवर ढकलाव्या आणि आपल्या सुखाला लागेल तें. आज करावं !

**उत्तम** : आज काय करायचं ?

**भय्या** : आज काय करायचं तें ठरलेलंच आहे. केशवमामाचा त्रास उद्यां सोसायचा, आणि आजचं आपलं कार्य सिंहगडाला जायचं—हो, अण्णासाहेबांना विचारलीस का परवानगी ? आजच आपण सिंहगड पाहायला जाणार आहोंत, लक्षांत आहे ना ? विचारलीस ना परवानगी ? आपल्या स्कूलची मोठी ट्रिप निघणार ! ( खिशांतून पत्र काढून ) अण्णासाहेबांना तुझ्याकरतां दिलेलं, सुपरिंटेंडेंटच्या सहीचं पाकीट ! आतां तरी परवानगी मिळेल ना ?

**उत्तम** : आतां खास मिळेल. मी याचीच वाट पाहात होतों. म्हणूनच अण्णासाहेबांना विचारलं नाहीं; नाहींतर मी तुला घेऊनच त्यांच्याकडे जाणार होतों. आतां परवानगी मिळायला अडचण नाहीं.

**भय्या** : मग अगोदर जा अण्णासाहेबांकडे. नाहींतर अण्णासाहेब जातील ऑफिसांत आणि मग बसशील हात जोडून काय करूं म्हणून ! जा पाहूं !

**उत्तम** : मी अगदीं नकोसा झालों आहें ना एक क्षणभर दोघांच्या मध्यें ! जातों बुवा, करतां काय !—

**कमला** : समजतं म्हटलं हें बोलणं मला ! काढीन बरं याचं उट्टं केव्हां तरी ?

**भय्या** : थट्टा करण्याचा उत्तमाचा हक्कच आहे, त्यांत रागवायचं कशाला ? हो, नकोस यावेळीं आम्हांला तूं इथं ! तुझ्यासारखं कां होईना ? झाली आहे तुझी अडचण; झालं आतां ! जा पाहूं तर मग ?

**उत्तम** : इतकी घाई झाली आहे ना भय्यासाहेब ! मला नव्हतं वाटलं कीं—

**भय्या** : अरे, अण्णासाहेबांच्या राज्यांतली प्रजा फार बोलूं लागली आहे ! माईचा नवा कायदा पास झाला कां बरं ?

**उत्तम** : नाहीं पण तुझ्या वडिलांना कळविलंच पाहिजे. ( शाळिग्राम पडद्यांत 'तुम्ही त्याची काळजी करूं नका, मी सर्व कळवितों—' )

**कमला** : ( आवाज ओळखून ) शाळिग्राम, कोणाला काय कळवायला निघाला आहेस !

**भय्या** : अमृतमामांचा कुणाला कांहीं तरी निरोप असायचा ! ( शाळिग्राम येतो ) काय रे, कुणाचा निरोप कुणाला घेऊन चालला आहेस ?

**शाळिग्राम** : आहांत का तुम्ही इथं ? बरी गांठ पडली. मी आपल्याला भेटणारच होतों !

**भय्या** : हें माझ्या प्रश्नाचं उत्तर नव्हे. मीं काय विचारलं ?

**शाळिग्राम** : तेंच मी सांगतों आहें. आपल्या गांवीं अमृतमामांचा निरोप आणि अण्णासाहेबांची चिठी घेऊन मी निघालों आहें.

**भय्या** : तें कशाला ?

**उत्तम** : हें काय सांगायला पाहिजे ?

**शाळिग्राम** : तेव्हां विचारणार होतों कीं, तुम्ही आपल्या गांवीं येणार आहांत का ? येणार असाल तर चला. घरची सोबत आहे. शिवाय कामहि तुमचंच आहे. ( कमलेकडे पाहात ) येणार नसलां तरी चिठीचपाटी द्या.

**भय्या** : एकूण अमृतमामांनीं प्रसंग जवळ आणला तर ! बरं जा, मी येणार आहें चार दिवसांनीं म्हणून सांग. जा—आज आम्ही सिंहगडाला गेलों म्हणून सांग. उत्तम जातोस ना ?

**उत्तम** : जातों—जातों—जातों ! शाळिग्राम, चल बाबा, ही मंडळी आपल्याला इथं उभं राहूं द्यायची नाहींत. मला घालवून लावीत होतीं. मी निघालों तों तूं आलास. चल अगोदर. शिवाय यांच्या नादाला लागून तुझी गाडी चुकेल—

**शाळिग्राम** : ताईसाहेब, इतकं अधीर व्हायला नको कांहीं, पुढच्याच महिन्यांत उरकेल बरं ' शुभमंगल ' !

**उत्तम** : आलोंच मी आँ ! ( जातात )

**भय्या** : तुला राग आला वाटतं थट्टा केली म्हणून ?

**कमला** : असल्या बोलण्याचा राग येतो का ? असं बोलायला कुणी हवंच असतं नाहीं तरी !

**भय्या** : हो हवंच असतं कुणी तरी ! पण उत्तम, शाळिग्राम, अमृतमामा, अशीं माणसं तसं बोलायला लागत असतात. काय जगाचा न्याय आहे पहा. आपल्या आवडत्या लोकांनीं वेडंवाकडं बोललं तर थट्टाविनोद ठरतो आणि तेंच नावडत्यांनीं म्हटलं तर, त्याच कुत्सित शिव्या ठरतात ! उत्तमानं म्हटलेलं, शाळिग्रामानं म्हटलेलं, जर माईनीं किंवा केशवमामानं म्हटलं असतं तर—

**कमला** : तें कसं आवडावें ? अमृतमामाचं, दादाचं, शाळिग्रामचं बोलणं झालं, तरी त्यांत काळीज कापणारे शब्द नसतात; निर्विष असतं त्यांचं बोलणं. पण माईचं, केशवमामांचं बोलणं म्हणजे कांहीं साधं नसायचं—विषानं भरलेला बाण असायचा तो !

**भय्या** : म्हणजे माई, केशवमामा तुझ्या मताप्रमाणं सर्प ठरतात! वा! वा! बरीच मनाची तयारी झाली? केशवमामा विषारी सर्प काय? ऐकतील हं केशवमामा! [ पाहून ] आले वाटतं केशवमामा? असं व्हायचेंच नांव काढतांच स्वारी दत्त म्हणून तयार! [ पुन्हा पाहून ] पण नाहीं, स्वारीचा मोर्चा अजून इकडे वळला नाहीं. पण उत्तम अजून कसा येत नाहीं? मला होतो आहे उशीर. पण तुझ्या शाळेंतील मुली नाहीं का जात सिंहगड पहायला?—

**कमला** : जरी गेल्या तरी आम्हांला कोण पाठवणार? माईसाहेबांनीं परवानगी तर दिली पाहिजे? आम्हांला पहायचा योग आला तर चित्रांत!

**भय्या** : तसा योग तर आंत्तांदेखील आला आहे. [ खिशांतून पुस्तक काढीत ] हें पाहिलंस? सिंहगडाचे निरनिराळया तऱ्हेचे देखावे. [ केशवमामा येतात. ]

**केशव** : [ स्वगत ] अरेरे, ही कारटी तर फारच बहकली? आतां उघड उघड आम्हांला चिडवूं लागली! माझा राग मला आवरेनासा होतो. पण काय करायचं? बोलायचं नाहीं. कोर्टिंग चाललं आहे काय? ठीक आहे. [ उघड ] काय भय्यासाहेब, काय चाललं आहे?

**भय्या** : कांहीं नाहीं, केशवमामा, चित्रं दाखवितों आहें.

**केशव** : ( स्वगत ) मला वाटलं प्रियाराधन चाललं आहे. [ उघड ] अरे, कांहीं लाजा बाळगा. उद्यां तुमचं लग्न होईल. कांहीं लाजा बाळगा. [ कमळा जाऊं लागते. ] जायला नको. असं नाहीं लाजायला सांगत कांहीं मी! आम्हां वडिलांच्यासमोर थोडी मर्यादा दाखवावी. निघून जाण्यांत कसली आली आहे लाज? बाकी अलीकडच्या काळांत लाज राहिली आहे कुठं म्हणा!

**भय्या** : तुम्ही कोणत्या काळांतले केशवमामा?

**केशव** : मी याच काळांतला! पण अलिकडचे चोचले नाहींत पसंत मला! मी पूर्वपरंपरेचा अभिमानी आहें. परंपरा सुटतां उपयोगी नाहीं. माझं सांगण्याचं तात्पर्य हें! बाकी, झालं तें चांगलं झालं! तुम्हीं दोघांनीं परस्परांना पसंत केलंत, आनंद आहे बुवा मला! तुम्हांला पसंत पडली ना आमची कमी? [ स्वगत ] काय करूं? ओठांच्या आंत एक आणि बाहेर बोलावं लागतं दुसरंच! ( उघड ) कमे, तुला पसंत पडले ना भय्यासाहेब? आतां सुखानें नांदा म्हणजे झालं. आमचं दुसरं काय म्हणणं आहे? ( दीर्घ निश्वास सोडून स्वगत ) असं बोलल्याखेरीज गत्यंतर नाहीं आम्हांला. लौकिक आहे ना हा!

**भय्या :** कां मामा ? तुम्हांला बरं वाटत नाहीं वाटतं ? प्रकृति नादुरुस्त आहे काय ?

**केशव :** [ पुन्हां श्वास सोडून ] नाहीं, तसं कांहीं नाहीं !

**भय्या :** नाहीं. प्रकृति नीट नसेल तर, मीं म्हणत होतों चला आमच्याबरोबर चार दिवस सिंहगडाला ! पुष्कळ विद्यार्थी आहेत बरोबर—हवापाणी सिंहगडावर उत्तम आहे. येत असलां तर खरंच चला. [ कमळेस ] अग माईना जाऊन सांग कीं, केशवमामापण जाणार आहेत सिंहगडाला म्हणून !

**केशव :** नको, नको ?—मला सवडच नाहीं. [ स्वगत ] असं यावेळीं झणझणीत उत्तर दिलं असतं, पण बोलायची वेळ नव्हे ही. देईन लवकरच याचं उत्तर ! [ उघड ] सिंहगडाला जाणार आहांत काय ? आमचा उत्तम येणार असेलच ? आणि अमृतमामांची नाहीं का तयारी ? ते आले असते तर कदाचित् मींहि सवड केली असती. अमृतमामा अलीकडे घरांतून बाहेर पडत नाहींत. !

**कमला :** [ स्वगत ] म्हणून आतां त्यांना बाहेर काढण्याची खटपट चालली आहे वाटतं ?

**भय्या :** त्या लोकांच्या आपण कशाला नादीं लागा ? [ उत्तम येतो. ] दिली अण्णासाहेबांनीं परवानगी ?

**उत्तम :** हो, ' जा ' म्हणून सांगितलं त्यांनीं ! ताई, तुला अमृतमामानं अगोदर बोलावलं आहे. ( कमला जाते ) भय्यासाहेब, सुपरिंटेंडेंटकडे जायचं आहे ना ?

**भय्या :** जायलाच पाहिजे तर ! त्यांनीं तुझी वाट बघत बसेन म्हणून सांगितलं होतं माझ्याजवळ ! मला वाटतं ते तुझ्याकडून सिंहगडावर एक व्याख्यान देवविणार आहेत !—

**उत्तम :** जाऊं या तर !

**भय्या :** ( केशवमामास ) तुम्ही नाहींच येत म्हणतां मामा ?—

( जाऊं लागतात. )

**केशव :** नाहीं, सवडच नाहीं. उत्तम, तूं व्याख्यान देणार असलास तर, मला अगोदर भेट. मी देईन कांहीं व्याख्यानांचे पॉइंट्स्. तुझी फजिती उडायला नको !

**भय्या :** अगदीं अवश्य ! बरं जातों आम्ही. [ दोघे जातात ]

**केशव :** [ रागानें स्वगत ] मी घरांत अगदीं निस्तेज होत चाललों काय ? हीं कालचीं कारटीं खट्याळ बनलीं आणि मला कःपदार्थ समजूं लागलीं अँ ? मला हिणवतात, मला चिडवतात ? तो अमृत्या आल्यापासून खरोखरच असं झालं

आहे. माझा दरारा नाहींसा होत चालला, मी नामशेष होऊं लागलों ? हा अमृत्या कोण ? जिथं तिथं माझी फजिती करतो. माझ्या हातांतलं हें सावजहि त्यानंच हिसकावून घेतलं आणि दुसऱ्याच्या ताटांत टाकलं ! त्या कावळ्याचा कावा पहिल्यांदा आम्हांला उमगलाच नाहीं ! आतां म्हणावं बच्चाजी, तुला आम्ही पुरा ओळखला आहे. ( तोंड वाईट करून ) पण त्यानंहि आम्हांला ओळखलं आहे-पुरतं ओळखलं आहे ! ताई या घरची मालकीण आहे. तिला कशाला या लुडबुड्याला वचकायला पाहिजे ? ताई त्याला कां घालवून देत नाहीं घरांतून ? ताईचीच ही चूक आहे. ताईच्या हातीं सत्ता आहे. ती अधिकाराचा उपयोग कां करीत नाहीं ? तें कांहीं नाहीं, ताईला आपल्या सत्तेचा उपयोग करायला मी लावणार ! ह्याशिवाय बिघडत चाललेलं बस्तान पुन्हां नाहीं बसणार ! बस्स, ठरला निश्चय. त्या अमृत्याला घरांतून घालविल्याशिवाय आपण या घरांत पाणी पिणार नाहीं म्हणून ताईला सांगणार ! ( हातांत एक पाकीट, कमरेला किल्ल्यांचा जुडगा, हातांत लोंबकळत असलेले दागिने आहेत अशा माईसाहेब प्रवेश करतात.)

**माई :** केशव-ए केशव, केशवा, इथं का आहेस तूं ? मी तुला तिकडं शोधीत गेलें होतें ! ( जवळ येऊन ) कां संतापला आहेस !

**केशव :** कां संतापूं नको ? या घरांत राहण्याची माझी काय शोभा राहिली आहे ? त्या कारट्यांनीं कुचेष्टा करावी, त्या अमृत्यानं माझं नाक कापावं, त्या जखमेवर त्या भय्यानें उठल्यासुटल्या मिठाचं पाणी ओतावं. मला या ठिकाणीं याच्यापुढं राह्यचंच नाहीं ! माझा घराबाहेर चोहोंकडे एवढा दाब-एवढं वजन-तो मी या घरांत कवडी किंमतीचा ठरूं लागलों-ज्या ठिकाणीं फुलं वेंचलीं त्या ठिकाणीं गोंवऱ्या वेंचूं ?

**माई :** अरे-होय-होय-शांत हो, तुला हें दिसतं आणि मला दिसत नाहीं का ! पण नुसतं रागावून काय होणार ? कांहीं तरी विचार नको का करायला ?

**केशव :** मीं केला आहे काय विचार करायचा तो ? त्या अमृत्याला घरांतून घालविल्याशिवाय आमची पूर्वीची घडी बसायची नाहीं ? त्या सापाला जागच्या जागीं ठेंचला पाहिजे !

**माई :** होय. मीदेखील तेंच म्हणतें. पण ठेंचायचा कसा ? युक्तीयुक्तीनेंच ठेंचला पाहिजे-अन् म्हणूनच मी तुला सांगायला आलें होतें, हें 'पाकीट' एकदां आपण फोडून पाहूं या. यांतला मजकूर त्या चांडाळानं पाहिला आहे आणि म्हणूनच तो खुषींत आहे. माझ्या बाबूचं तिकडून कांहींच हित पाह्यचं झालं

नाहीं हें त्यावरून दिसतंच आहे. काय तें एकदां पाहूं तर खरं ? साप आहे, तो ठेंचलाच पाहिजे. पण साप महादेवाच्या पिंडीवर वेटोळं घालून बसला आहे ना ?

**केशव** : म्हणूनच तर मला जास्त संताप आला आहे. नाहींतर त्या सापाला केव्हांच टांचेखालीं ठेंचला असतां !–पण त्याला मारावं, तर पिंडीला धक्का लागेल. अण्णासाहेबांना त्यानं आजकाल जसं कांहीं भारूनच टाकलं आहे.

**माई** : त्यानं माझं सगळं घरच बिघडवून टाकलं. नाहीं तर तो यायच्या आधीं आपलं कसं सुतासारखं सरळ चाललं होतं. मेला शाळिग्राम–तोदेखील त्यांच्याच बाजूचा झाला आहे. जेव्हां तेव्हां आपला आमच्या नेमका उण्यावर उठतो. जो तो आम्हीं काय करतों, काय नाहीं, हें पाह्यला टपलेला.

**केशव** : पण ही सारी तुझी चूक आहे !–घर तुझं आहे ना ?–तूं मनांत आणलंस, तर त्या अमृत्याला हें घर सोडायला किती उशीर लागेल ?—

**माई** : म्हणून म्हणतें कीं, आपल्याला तशीच कांहीं युक्ति काढली पाहिजे. अनायासं, शाळिग्राम नाहीं, तें कारटंहि जाणार आहे सिंहगडाला. म्हणून सांगतें कीं अशा वेळेला कांहीं तरी करतां येईल, नाहीं का ? माझ्या मनांतून आहे–( चोहोंकडे पाहते. )

**केशव** : काय आहे तुझ्या मनांत ?—

**माई** : हें पाकीट एकदां आपण फोडून पाहूं या–या पाकिटांतल्या कागदाचा आपणांला घोंटाळा नाहीं का करतां येणार ?–एक युक्ति फसली म्हणून काय झालं ?—

**केशव** : आण पाहूं तें पाकीट–( पाकीट फोडतो. ) काय ? हें वुईल ? हे कसलं वुईल ? हा तर शुद्ध कोरा कागद ?–

**माई** : ( साश्चर्य ) काय कोरा कागद ? म्हणजे, मला देखील फसवायचं झालं का तिकडून ? हेंच का माझ्या मनासारखं केलं आहे ?–

**केशव** : ( विचार करून ) नाहीं, ही अण्णासाहेबांची चूक नाही, असला फाजीलपणा करण्यांत त्या संभावित लुचाचंच अंग असलं पाहिजे. त्यानं मुद्दाम केलं नसेल कशावरून ? अण्णासाहेबांनीं त्या पाजी माणसाला वुईल दाखविलं होतं ना ? मग झालं तर !–

**माई** : पण आतां ? आतां काय करायचं ? ( हातांतील दागिना न कळत खालीं पडतो ) आतां तो कागद आपल्याला कसा मिळणार ? त्या मांगानं जर घेतला असेल तर–पुन्हां आपल्याला मिळणार ? आशाच नको ! माझ्या बाबूला पुरं पुरं

नागवलं मेल्यांनीं—माझ्या पोराला—पुरतं लुटलं कीं! आतां तिकडं काय सांगायचं ?—केशवा !—(प्रेमाबाई प्रवेश करते) प्रेमाबाई, माझ्या बाबूचा घात केला बरं पुरा घात केला!—

**प्रेमा** : (घाबरून) काय झालं ? काय झालं ?

**माई** : काय व्हायचं आहे ?—बाबूच्या भाईबंदांनीं अखेर दावा साधलाच! तिकडून केलेलं मृत्युपत्र पळवून नेलं!—कशी मला बुद्धि सुचली अन् मीं पाहिलं! मला काय माहीत हें असं होईल म्हणून ?—आतां तो कागद आपल्याला कसा हो परत मिळणार ?—

**प्रेमा** : न मिळायला काय झालं? तो कागद कोरा आहे ना? कोरा कागद असला काय अन् नसला काय ? मृत्युपत्र हरवलं काय, कुणी चोरून नेलं काय, किंवा फाडून टाकलं काय सारखंच नाहीं का ? (कागद हातांत घेऊन फाडीत असतां खालीं पडलेल्या दागिन्याकडे नजर जाते व उचलून घेते) तुमचा कागद फाटला! आतां घ्या नवा करून अण्णासाहेबांकडून ?

**माई** : मला तिकडं सांगायला काय तोंड आहे ? कोणच्या तोंडानें तिकडं सांगूं?

**केशव** : पाकीट हरवलं म्हणून सांग—हीच युक्ति बरी! हरवलं म्हणून सांगितलं कीं संपलं!

**प्रेमा** : हं—हं असंच सांगा. अण्णासाहेबांना सांगा, पाकीट माझ्या हातून हरवलं म्हणून!

**माई** : असं कसं सांगू ? एवढा महत्त्वाचा कागद, हरवला कसा म्हणून विचारलं तर काय सांगूं? कागद कसा हरवेल ?

**प्रेमा** : (हातीं घेतलेला दागिना पुढं करून) हरवायला काय कठीण आहे ? हा आपला जिन्नस केव्हांचा पडला होता—हरवला होता कीं नाहीं ? आपल्या हातून हा केव्हां खालीं पडला—मीं केव्हां उचलून घेतला, कळलं का माई ? होतं का तुमचं लक्ष ? नव्हतं ना ? मग हा जिन्नस कसा हरवला ?

**माई** : (दागिन्याकडे पाहून) खरंच कीं ! जिन्नस कसा ग बाई माझ्या हातून पडला ? पण बरं झालं, तुम्ही होतां—

**प्रेमा** : तसाच तुमचा कागद परत मिळेल. नाहीं का केशवमामा ? तुम्हांला कसं वाटतं ?

**केशव** : हो—असंच! आपली युक्ति फसली, तशी ही फसायची नाहीं !

**माई** : पण कागद हरवला म्हणून सांगायचं मला कसंसंच वाटतं !

**प्रेमा** : हरवला नाहीं तर चोरीला गेला म्हणून सांगा.

**केशव** : ( सानंद ) हो-हो-ही युक्ति सोळा आणे आहे ! कागद चोरीला गेला असंच उठवावं !

**प्रेमा** : हरकत नाहीं ! चोरांचीं नांवं सांगायला कांहीं घराच्या बाहेर जायला नको.

**माई** : बोटं दाखवायला घरचेच चोर आहेत कीं ! हें बरं काढलंत, हें जुळेल ! मग प्रेमाबाई, तो जिन्नसहि तुमच्याकडंच राहूं द्या. हवे तर मी आणखीं चार जिन्नस-ठळक ठळक-तुमच्याजवळ देईन. काय कराल तुम्ही ? सांगा बरं काय कराल ?

**प्रेमा** : य जिन्नसांची रोख रक्कम होईल कीं !

**केशव** : रोख रकमेचे रूपांतरानें जिन्नसहि करतां येतील ! हरकत नाहीं. असंच करायचं ! ताई, याच घटकेला प्रेमाबाईच्या स्वाधीन काय करायचं ते करा !

**प्रेमा** : मग उत्तमाला चोर म्हणून अण्णासाहेबांच्या पुढं उभा करा !

**केशव** : त्यांत त्या अमृत्याचंही अंग आहे असं ठरवून देऊं. दागिन्यांचा दुजोरा कागदाला मिळाला अण्णासाहेबांना संशय घेण्याचं कारणच उरणार नाहीं. आतां सांगेन त्या अमृत्याला या केशवाची कारवाई ! ( मिशीवर पीळ देत ) ताई, अगोदर प्रेमाबाईच्या हातीं चार जिन्नस टाक ! ही संधी अनुकूल आहे, साधली पाहिजे. कारटा गेलाच आहे सिंहगडला. त्याच्या जिवलग दोस्तांच्या नांवानं त्याला तिकडेच कळवूं कीं, ' आतां इकडे येण्याच्या भानगडींत पडूं नको. तुझ्या-वर घरांतल्या चोरीचा आरोप आहे.' पुन्हां कारटा तोंड दाखवायचा नाहीं या घराला ! मग त्या अमृत्याला घरांतून घालवायला कितीसा उशीर ? याच वेळीं ही संधी साधली पाहिजे. प्रतिपक्ष या वेळीं कमजोर आहे. त्यांचा साथीदार तो थेरडा शाळिग्राम, त्यांच्याच बाजूचा आहे बरं का ? तो इथं नाहीं. उत्तमानंहि घराबाहेर पाऊल टाकलंच आहे.

**माई** : सगळ्या गोष्टी कशा अगदीं मनासारख्या जुळून आल्या आहेत. आतां नाहीं पहिल्यासारखं फिसकटायचं ? असं कांहीं युक्तीयुक्तीनंच केलं म्हणजे त्या अमृत्याला घरांतून काढायचं जमेल असं वाटतं ! नाहींतर त्याच्याविरुद्ध तोंडां-तून ब्र काढायची सोय नसते. मनांतून पुष्कळ त्याच्याबद्दल हेवादावा वाटतो !

**केशव** : पण आतांच्या सुरुंगानं सारेच चार दिशेला उडतील कीं नाहीं ? आतां इतकं लक्षांत ठेवायचं कीं, त्या कारट्यांची आणि अमृत्याची हरएक प्रयत्नानं भेटच होऊं द्यायची नाहीं-ताटातूट करायची. संबंधच येऊन नाहीं उपयोग ! सध्यां त्या कारट्याची तर झालीच आहे ताटातूट, तशीच त्या कारटीची करूं;

म्हणजे त्यांना आमच्या विरुद्ध बेत करायला सवडच द्यायची नाहीं. आमचे बेतहि त्यांच्या कानावर जाऊं द्यायचे नाहींत–

**प्रेमा** : त्याशिवाय सोयच नाहीं. एवढं झालं म्हणजे बाई माझा जवि भांड्यांत पडेल ! चला, द्या माई चार जिन्नस. मी उद्यां माहेरीं जाईन. ( स्वगत ) आज-कालचे दिवस देव बरे आणतो आहे. आपला एक तरी जिन्नस होईल या गडबडींत ! पुष्कळ झालं. ( उघड ) माहेरीं गेलं म्हणजे बोभाटा होणार नाहीं.

**माई** : तुम्हांला माहेरीं जायचं आहे, तेव्हां आमच्या घरीं कोणाला संशय यायला नको. सकाळपासून त्या कारट्याचं या घरांत रडवं तोंड करून नाहीं आणि त्या शाळिग्रामाची रिकामी धुसपुस नाहीं. तेव्हां घरांत कसं अगदीं मोकळं मोकळं वाटतं आहे. चला–चार जिन्नस काय द्यायचे ते देतें. पण आलांत तशी माझी वेणी तर घालून चला— ( जातात. )

---

## प्रवेश २ रा

[ अमृतमामा येतो. ]

**अमृत** : मला अण्णासाहेबांच्या मनाची मौज वाटते ! या लोकांना मोठमोठ्या गोष्टी पटतात ! दूरचं दिसतं, पण जवळच्या गुंतागुंती जशा असतील तशा दिसत नाहींत ! आमच्या देशाचे हाल व्हायचं कारण, तो सावत्र आईच्या सत्तेखालीं आहे असं सांगितलं तर अण्णासाहेब मान डोलवतात. आमचा देश त्या त्रासांतून सुटला पाहिजे, त्याशिवाय त्याची कुचंबणा सुटणार नाहीं, असं मोठ्या आवेशानें बोलून दाखवितात. पण तेच, त्यांच्या घरांत काय चाललं आहे, हें त्यांचं त्यांना कळत नाहीं ! उत्तमाचे आणि कमलेचे हाल असेच आपल्या घरीं होत असतील, किंवा होत आहेत, ही कल्पनाच अण्णासाहेबांना होत नाहीं ! त्यांना कितीहि समजावून सांगा. त्यांचें तें खरं ! पहिली माणसंच हट्टी ! त्यांच्या कलाप्रमाणं घेऊन कोणतंही कार्य साधलं तर बरं, नाहींतर फिसकटलं ! ही गोष्ट अण्णा-साहेबांचीच आहे असं नाहीं–चोहोंकडे एकच प्रकार–फक्त तऱ्हा निराळी ! सावत्र-पणा म्हटला कीं, तिथं सारे प्रकार कमीअधिक प्रमाणानं असायचेच ! सावत्रपणाच्या सपाट्यांत सांपडलेलं घराणं, हिंदूचं, मुसलमानाचं, पारशाचं, युरोपियनाचं कोणाचं आणि कुठलंहि असो, श्रीमान् असो कीं दरिद्री असो, तिथं असे संबंध, अशा भावना नाहींत, असं व्हायचंच नाहीं ! मानवी मनोधर्म कुठल्याहि अवस्थेंत असला तरी कसा बदलणार ? मनोवृत्ति बदलत नसल्या तरी त्याकरितां जग

थांबलेलं नाहीं. जगाचा व्यवहार चाललेलाच आहे. तो व्यवहार कोणी तरी योजक चालवितो आहे यांत शंका नाहीं. परंतु त्या योजक परमात्म्याचे प्रतिनिधी, देशाचे अध्वर्यु, समाजाचे शास्ते, आमच्याकडे तरी एकंदरीनें अगदींच कमी आहेत; म्हणून आमचा देश, आमचा समाज, आमचें कुटुंब, जगाच्या पाठीमागं पडून त्यांची उन्नतींकडे पडणारीं पावलंहि मंद गतीनं पडत आहेत. उत्तमासारखा हिरा पैलू पाडून पुढं मांडला, तर तो आपल्या घरालाच काय, पण समाजाला, देशाला शोभा आणील, इतकंच नव्हे, तर तो देशाचं वैभव वाढवील. पण हें पहातो कोण? उलट उत्तमासारखीं रत्नं मातीमोल करण्याची माईप्रभृती मंडळींची मसलत अहोरात्र चाललेली दिसते. तेव्हां आमच्या देशाचं दुर्दैवच नव्हे तर काय! उत्तमासारखे किती अमोलिक हिरे खाड्यांत पडले असतील आणि पडत असतील? म्हणून तर ही सर्वत्र स्थिति! त्यांत कुटुंबांतल्या कारभारांत काय किंवा देशकार्याच्या खटपटींत काय सुळसुळाट झाला आहे तो केशवमामासारख्या बांडगुळांचा. अशीं बांडगुळं समाजांतून उजळ माथ्यानं वावरतात, म्हणून आमची उन्नति होत नाहीं. असल्या कचाटांतून उत्तम–कमळेसारखीं मुलं सुटलीं, त्यांना योग्य मार्ग मिळाला, तर राष्ट्राचा रंग खाडकन् पालटेल. मनुष्य सुधारला कीं कुटुंब चांगलं होईल. कुटुंबाची शोभा वाढण्याबरोबर समाजांत सजीवता येईल. समाजाची सजीवता देशाच्या उन्नतीच्या कार्यांत कोणतें साह्य देणार नाहीं? सारांश कुटुंब सुधारलं पाहिजे, प्रत्येकानं आपलं घर सुधारलं पाहिजे; दुसरं कांहीं करायला नको. पण हा विचार ज्याच्या घराचा त्यानं करायला पाहिजे, दुसऱ्या तिसऱ्यानं करून काय फायदा? आणि तिऱ्हाईत करून करून किती करील? फार तर मी अण्णासाहेबांच्या घराबद्दल करतों इतका! कमलेचं लग्न करून तिला आपल्या घरीं पाठविली, उच्च शिक्षणाकरितां उत्तमाला इथून उचलून तो स्वतः कर्ता होईपर्यंत दुसरे ठिकाणीं ठेवला म्हणजे माझं कार्य संपलं! खटपटी लटपटी करून, अण्णासाहेबांकडून जसा कमीच्या लग्नाचा योग जुळविला, तसाच उत्तमाच्या परीक्षेचा रिझल्ट लागतांच, त्याला माईपासून मुक्त केलं म्हणजे सुटलों! ठरविलेली योजना शेवटास जाईपर्यंत माईसाहेब आणि त्यांचा कंपू शहाणे असतील तर मागल्याप्रमाणं मुलांवर आणखीं कांहीं वादळ उठविणार नाहींत. पण म्हणून गैरसावध असून भागायचं नाहीं. अंगीकृत कार्य यथायोग्य माझ्या हातून झालं तर एवढं कुटुंब तरी सुधारण्याच्या मार्गाला लावण्याचं श्रेय माझ्या खात्यावर चित्रगुप्त लिहून ठेवील— (कमला प्रवेश करते)

**कमला** : मामा—मामा—

**अमृत** : ( कमलेकडे लक्ष जाऊन ) कोण ! कमा कां ?

**कमला** : इथं आहेस कां ?

**अमृत** : ( थट्टेनें ) नाहीं ! मी इथं नाहीं !

**कमला** : नाहीं काय ? कांहीं तरीच बोलतोस !

**अमृत** : माझ्या बोलण्यावर तुझा विश्वासच नाहीं त्याला मी तरी काय करूं ! मी प्रत्यक्ष सांगतों आहें, मी इथं नाहीं म्हणून ! ( कमला हंसते ) बरं काय सांगणार आहेस ? कांहीं करमेना वाटतं ?

**कमला** : करमेना हें तर खरंच. दादा नाहीं घरांत—

**अमृत** : आणि भय्यासाहेब गेला आहे त्याच्याबरोबर !

**कमला** : ( लाजून इकडे तिकडे पहात ) पण मामा, कालपासून प्रेमाबाई परगांवीं गेली आहे.

**अमृत** : गेली असेल, तुला काय करायचं आहे ? कां तिच्याशिवाय तुला करमेना ? हो करमत नसेल खरंच तुला. तिच्याशिवाय तुला माईच्या बरोबरीनें काम कोण सांगेल ! तूं मंडईतून भाजी कोणाला आणून देशील ! नसेल करमत प्रेमाबाईशिवाय तुला अं ! पण ती येईल चार आठ दिवसांत !

**कमला** : तसं नव्हे मामा. ( पुनः चोहोंकडे पहात ) प्रेमाबाई गांवाला गेली आहे. माई, केशवमामा, प्रेमाबाई, कसली तरी मसलत करीत होत्या. मीं ऐकलं म्हणून मला भीति वाटते. काय होईल नी काय नाहीं ! कसला कट केला असेल ? म्हणून मी तुला सांगायला आलें—

**अमृत** : बरं केलंस. ( स्वगत ) तरी पण मुलगी चाणाक्ष ! ( उघड ) बरं, अण्णासाहेब काय करताहेत ? त्यांचा चहा झाला का ? झाला असल्यास मलाहि थोडा घेऊन ये जा.

---

## प्रवेश ३ रा.

[ **स्थळ** : अमृतमामाची खोली. **पात्रें**:—अमृत व शाळिग्राम. ]

**शाळि०** : ( अमृत झोंपण्याच्या तयारींत असतां प्रवेश करून ) मामा, अहो अमृतमामा, दिवसासुद्धां झोंपतां मामा ? संध्याकाळ झाली कीं !

**अमृत** : तूं उठवलंस म्हणून जागा झालों. किती वेळ झाला येऊन ? गेल्यासारखं काम झालं ना ?

**शालि०** : म्हाताऱ्या माणसांनीं हातीं घेतलेलं काम व्हायचं नाहीं असं झालंय कधीं ? आलों, अण्णासाहेबांना तिथली हकीकत सांगितली आणि मग तुम्हांला शोधीत इकडे आलों !—

**अमृत** : ठीक झालं. कमीच्या काळजींतून आपण सुटणार म्हणायचे ? बरं, पण भय्यासाहेबाचं घरदार, शेतवाडी पाहिलीस ? कसं काय आहे ?

**शालि०** : तें कांहीं विचारूं नका. इनामदारांचं ऐश्वर्य पाहून आपण तर थक्क झालों. आतां खेडं आहे इतकंच ! पण इनामदारांचा एकंदर खटला फारच दांडगा ! तात्यासाहेब इनामदार फार सज्जन माणूस ! काडीचा गर्व नाहीं—

**अमृत** : अस्सं ! सगळं ठीक झालं म्हणतोस ? इनामदारांनीं सांगितलं काय ?

**शालि०** : ( पत्रें देत ) हीं पत्रंच त्यांनीं दिलीं आहेत, त्यांत सारा खुलासा केला आहे त्यांनीं !—

**अमृत** : अरे वा ! छान, सोळा आणे काम झालं ! किती लीनतेनं पत्र लिहिलं आहे हें ! पण हें दुसरं पत्र कसलं ?

**शालि०** : वाचल्यावर कळेल. अमृतमामा, सांगकाम्याप्रमाणं सांगितलं तेवढंच काम करून येणारा मी नाहीं. एका कामांत चार कामं करून येणाऱ्याला व्यवहार-चतुर म्हणतात. उगीच नाहीं काळ्याचे पांढरे झाले ? मामा, तीं पत्रं वाचा म्हणजे तुम्हांला कळेल कीं, मीं किती कामं केलीं आहेत तीं; आणि तुम्हींच माझ्या प्रत्येक कामाबद्दल शाबासकी, बक्षीस, मान, किताब द्याल—

**अमृत** : ( हंसत ) अस्सं ! ( पत्र फोडून वाचूं लागतो ) अरे, हें पत्र कसलं ? ही तर दागिन्याची यादी ! ही कसल्या दागिन्यांची यादी ?

**केशव** : ( प्रवेश करून ) कसल्या दागिन्यांची यादी मामा ?

**अमृत** : तात्यासाहेब इनामदारांकडून आली आहे. कमीच्या अंगावर घालण्या-करितां जे दागिने केले आहेत त्यांची यादी आहे ही. माणसं अगदींच साधीं दिसतात. किती दागिने हे केशवमामा ? पण ही यादी कशाला पाठवायला पाहिजे होती ? दागिने काय घालणार म्हणून आम्हीं थोडंच विचारलं होतं ?

**केशव** : पाहूं तर खरं अशी काय यादी आहे ती ?

**अमृत** : ( हातीं न देतां ) मी वाचतों ऐका कीं ! ( वाचून झाल्यावर ) कुणाला माहीत आहेत हीं नांवं तरी ? पुन्हां लिहितात, सोन्याचा साज निराळा, मोत्यांचा निराळा, हिरे माणकांचा निराळा ! कमी खरोखरच नशीबाची मामा !

**शालि०** : ( स्वगत ) गांठ पडली ठका ठका ! आणि त्याचें वर्म जाणें म्हणे

हा तुका ! ( उघड ) केशवमामा मी आपला थट्टेनं विचारतों, कीं कमी तुमची बायको झाली असती तर या दागिन्यांपैकीं कोणते दागिने तुम्हीं घातले असतेत ?

**अमृत** : ( शाळिग्रामास ) अरे, ह्यांनीं दागिन्यांची यादीच तिच्या गळयांत बांधली असती ! कां मामा ?—

**केशव** : असले दागिने मला मिळाले नसते ही गोष्ट खरी, पण माझ्यासारखा दागिना तर नाहीं मिळाला अखेर ?—

**शाळि०** : देवाघरीं घडलेला हा आपल्यासारखा दागिना तो भय्यासाहेब खचित नाहीं. खरोखर, या दागिन्याची योग्यता कांहीं निराळीच !

**अमृत** : ( संभावीतपणानें ) साऱ्याच गोष्टी कुठं एके ठिकाणीं जमत असतात ? दांत आहेत तिथं चणे मिळायचे नाहींत आणि चणे असले म्हणजे दातांनीं पळ काढलाच म्हणून समजा. चालायचंच हें ! ( विषय बदलून ) वर्तमानपत्र कसलं मामा ? Times of India वाटतं ? नवा का ? काय लेटेस्ट न्यूज आहे ?

**केशव** : नवा नाहीं हा अंक—आहे जुनाच !

**शाळि०** : जुने अंक आतां वाचतां ?

**अमृत** : अरे कांहीं रेफरन्सेस् पाहात असतील. जुने अंक चाळणं कांहीं वाईट नाहीं ! कसले रेफरन्सेस् पाहातां ? फार फार उद्योगी बुवा मामा तुम्ही !

**केशव** : ( स्वगत ) आतां यांना या पत्रांतल्या न्यूज सांगतों. ऐका म्हणावं— ( उघड ) नुसत्याच झालेल्या 'महायुद्धाची हकीकत' वाचतों आहें मी ! वाचायला लागलों म्हणजे थक्क होऊन जातं मन ! दोस्त सरकारचे केवढे डावपेंच ? छे, छे, बुवा ! विलक्षण—विचित्रच त्यांचे प्लाट्स् ? अमृतमामा, तुम्हीं नाहीं कधीं वाचल्या त्या हकीगती ? तुम्हांला वाटली नाहीं मौज ?

**अमृत** : मी वाचीत असें, पण त्यांच्या या प्लॉटपेक्षां, त्या प्लॅाटची बित्तंबातमी कैसरला देणाऱ्या जर्मन देशाच्या अजब युक्त्या वाचतांना मला फार मौज वाटत असे. ( शाळिग्रामास ) तुला नाहीं कळायचं हें ? या वर्तमानपत्रांतल्या लढाईच्या हकीकती आहेत !

**केशव** : ( स्वगत ) असं काय ? म्हणजे हे जर्मन हेर वाटतं ? आतां जास्त बोलण्यांत अर्थ नाहीं, नाहींतर भलत्याच ठिकाणीं घसरायचं ! ( उघड ) बाकी तुम्ही म्हणतां तें कांहीं खोटं नाहीं एवढं खरं ! जर्मन हेरांचा चाणाक्षपणा आमच्या इकडच्या हेरांत नाहीं !

**अमृत** : [ स्वगत ] याला वाटतं आहे 'मी दोस्त सरकारच आहें जसा कांहीं !'

[ उघड ] मामा, जर्मन हेरांचं पाणी अंगीं आणायला, आमच्या इकडचं दोस्त सरकार कुठं आहे तितकं प्लॉट करण्यांत तरबेज ?

**केशव** : ( स्वगत ) तेंहि आतां लवकरच समजेल. घोडा मैदान कांहीं दूर नाहीं !

**अमृत** : बाकी, पुढं मागं आपले लोक तयार होतील. दिवसेंदिवस आपण सुधारत आहोंत ? ( आठवल्यासारखें करून ) अरे हो, मामा किती वाजले ?

**केशव** : साडेसात झाले.

**अमृत** : साडेसात ? तर शाळिग्राम, अण्णासाहेबांच्या ऑफिसांत टांगा पाठवायला पाहिजे. अण्णासाहेबांना येण्याला उशीर लागेल.

**केशव** : तर मग आमच्या सभेचीहि वेळ झाली कीं ! अमृतमामा, आजच्या माझ्या व्याख्यानाला आपण याल का ? युद्धाबद्दल आजचा विषय आहे, मग येतां का ?

**अमृत** : अगदीं अवश्य ! तुम्ही पुढं व्हा. अण्णासाहेब घरीं येतांच निघतोंच ! तात्यासाहेबांचीं हीं पत्रें त्यांना देतों, म्हणजे झालें ! मी येणारच आपल्या व्याख्यानाला. [केशवमामा जातो.] शाळिग्राम धन्य आहे तुझ्या चाणाक्षपणाची ! तात्यासाहेबांनीं या पत्रांत सर्व मजकूर अगदीं स्पष्ट लिहिला आहे आणि तुझ्या चाणाक्षपणाची तारीफ केली आहे. पाहिलंस, कितीहि गुप्तपणानें पापाचरण करण्याचा प्रयत्न केला असला तरी तें पाप कोणत्या ना कोणत्या वेळीं बाहेर आल्याखेरीज रहात नाहीं ! त्याचें प्रत्यंतर म्हणजे हें पत्र ! एकंदरींत मंडळी निधड्या छातीची खरी ! शाळीग्राम, आतां थट्टेवर नेऊन भागायचं नाहीं, त्या मंडळींना पुरतं तोंडघशीं पाडलं पाहिजे. त्याशिवाय याचा सोक्षमोक्ष व्हावयाचा नाहीं. चला, मला सगळी हकीगत तुझ्याकडून ऐकूं दे म्हणजे पुढें काय करायचं तें करतां येईल. [ जातात. ]

---

## प्रवेश ४ था

[ **स्थळ**:—कमलेची खोली. कमला बाहेरून येते.

**कमला** : आज मनाला असं कां वाटतं तेंच कळेना ! वाचायला लागलें, विणावं म्हटलं, कांहीं तरी घरांतलं काम करावं म्हटलं, पण कांहींच करायचं सुचेना आणि बरंहि वाटेना. मैत्रिणींतून फिरून आलं, तरी मन आपलं उदासच ! दादा नाहीं म्हणून असं झालं असेल का ? पण आज येणारच आहे दादा ! अमृतमामा

इतका थट्टा करायचा पण तो आज कुणाशींच बोलेना. मी बोलून बोलून दमलें; कां मामा बोलत नाहीं म्हणून हुरहुर वाटते आहे ? तसेंच असेल. काय होणार आहे कोण जाणे ! माई, केशवमामा, प्रेमाबाई केव्हांपासून तरी ज्या त्या ठिकाणीं उभ्या राहून कसली तरी मसलत करीत आहेत. त्यांची कुजबुज चालली असतांना मीं बाहेरून येतांना सहज पाहिलं, त्यांनींही मला पाहिलं. त्यांची नजर इतकी चमत्कारिक होती कीं, पाहिल्यापासून मला अशी हुरहुर वाटायला लागली ! मी केव्हां सुटेन या त्रासांतून असें मला झालं आहे ! मी सुटेन. उद्यां लग्न झाल्यावर मी सुटलेंच म्हणायची ! पण दादा केव्हां अन् कसा सुटणार ? दादा माझी बहीण असता तर तोहि गेला असता लग्न झाल्यावर आपल्या सासरीं, अन् मग त्याच्या पाठीमागचा माईचा त्रास चुकला असता. लगीन झाल्यावर मी सुटेन; पण दादाला सोडवायला माझ्या हातीं कांहीं नाहीं. दादा, मी तुझ्याकरतां काय करूं ? लगीन झाल्यावर मी सुखाच्या संसारांत पडेन. तूं माझ्या सासरीं आलास तर मी ठेवून घेईन. आपण बसूं, बोलूं, हसूं खेळूं. पण तें किती दिवस ? पुन्हां तुला माईच्या त्रासाचे तडाखे घ्यायला परत गेलंच पाहिजे. दादाला सुटायला मार्ग नाहीं म्हणून मला वाईट वाटतं; म्हणून मला रडूं येतं. [ रडूं लागते. ] अमृतमामा तरी काय करणार आहे, हेंहि कळेना. माझ्या दादाकरतां मला काय बरं करतां येईल ? काय केलं म्हणजे दादाची सुटका होईल ? कोणी सांगेल का मला ?

**केशव** : मी सांगतों तसें कर म्हणजे होईल तुझ्या दादाची सुटका ?

**कमला** : [ घाबरून स्वगत ] अगबाई, केशवमामा केव्हांशी आले ? आड उभे राहून यांनीं माझं बडबडणं ऐकलं तर नसेल ? ऐकलं असेल तर पंचाईत म्हणायची ?–केवढ्यानं मी आतां बडबडत होतें !

**केशव** : तुझ्या दादाची सुटका व्हायला पाहिजे ना ? बोल, त्यांत काय कठीण आहे ? आपल्या हातचं आहे तें ! कळलं आहे आम्हांला सर्व कांहीं !

**कमला** : [ स्वगत ] हें काय भलतेंच विचारायला लागले ?—

**केशव** : बोल बोल, काय सांगायचं असेल तें खुशाल सांग ! उत्तमानं काय केलें आहे, तें तुझ्याकडून तर कळूंदे !

**कमला** : [ स्वगत ] म्हणजे ? हें काय विचारायला लागले ?—

**केशव** : अजून का सांगायला भीति वाटते ? मी सांगतों ना आम्हांला सर्व कांहीं कळलं आहे–आतां लपविण्यांत काय अर्थ आहे ? केलं, झालं, कळलं; मग सांगायला कोणती हरकत ?—

**कमला :** ( स्वगत ) आतां काय करायचं ? हें काय आहे ?—

**केशव :** अग तूं बोलत कां नाहींस ? नीट रीतीनं सांग म्हणतों आहें. उत्तमानं काय केलं आहे तें तुला माहीत आहे ना ? त्याच्या हातून अपराध होऊं नये झाला, आम्हांला तो कळला. बरं तो तूं कबूल केलास तर तुला त्याच्याबद्दल कोणी शिक्षा करील असंहि नाहीं. तुझंहि होतं ना दादाला साह्य ? असायचंच. त्याखेरीज तो एकटा काय करणार ? आम्हांला सांगायचं नसेल, तर तूं आपल्या अमृतमामाला सांग, मग तर झालं ना ? अमृतमामाची तर नाहीं ना भीति वाटत ? तसं असेल तर त्यांना देतों इकडे पाठवून ? देऊं का ? कीं सांगितलं आहे याच्या आधींच ? सांगितलं असलं तरी हरकत नाहीं. पोरबुद्धीनं उत्तमानं केलं, त्याबद्दल त्याला कोण बोलतो कीं मारतो ? कां ˝ नाहीं ? अमृतमामाला सांगितलं आहे ना ?

**कमला :** ( स्वगत ) मी अगदींच गोंधळून गेलें आहें. मामा विचारतात काय, अन् मी सांगूं काय ? का कसली यांच्या कारस्थानाची सुरवात ही ! मघाचं माईचं आणि यांचं कुजबुजणं तर नसेल ?

**केशव :** काय कमे, असा त्रास कांहीं देऊं नकोस. मी तुझ्यावर रागावलों आहें का ? मग बोलत कां नाहींस ? लाज वाटते होय तुला ? पण—आतां मला लाजण्याचं कांहींच कारण नाहीं, मी कांहीं तुझा भावी पती नाहीं. ( कमला जाऊं लागते,) थांब, जाऊं नकोस. विचारतों त्या प्रश्नांचीं उत्तरं दे. काय झाली आहे हकीकत ? माईच्या पेटीचं कुलूप काढून, दागिने घेऊन, उत्तम पळून गेला हीच ना हकीकत ? मग सांग कीं असं ? मी तेंच विचारतों आहें !

**कमला :** ( स्वगत ) काय ऐकलं मीं हें ? दादानं दागिने चोरले, अन् तो निघून गेला ? आई—आई, काय हें कुभांड ? अग बाई, मला असं फिरल्या फिरल्यासारखं कां होत आहे ? माझ्या डोळ्यांपुढं अंधारच दिसूं लागला !

**केशव :** काय कमे, [ रागाचा आव आणून ] इतकं सामोपचारानं विचारलं तरी तूं दाद देत नाहींस ! पहा बरं ? मी अजून संतापलों नाहीं ! उत्तम गेला आहे तो परत येणार किंवा नाहीं ? दागिन्यांचं काय करणार आहे ? सगळं सगळं—जसं तुम्हीं ठरविलं असेल तसं सांगा ! तर घडपणें सुटका होईल ! झटकन् सांगून टाक सगळं ! ( कमळा रडूं लागते. ) अं ! हें शेवटचं अस्त्र काढलंस काय ? नाहीं, तरी तूं नाहींच ऐकणार ! तुला तुझ्या माईच्या हातचा मारच पाहिजे—अजून सांग, केली कीं नाहीं तुझ्या भावानं चोरी !

**कमला** (रडें थांबवून निश्चयीपणानें) नाहीं, माझा दादा चोर नाहीं समजलांत ?
**केशव** : अस्सं ! आतां तुझं खरं स्वरूप बाहेर पडलं ! उत्तम चोर नाहीं काय ? नाहीं तुला कबूल करायचं ? चौदावं रत्नच पाहिजे. त्याचीही तयारी आहे समजलसि ! चोर ते चोर—

**कमला** : कोण चोर मामा ? चोर-चोर कुणाला म्हणतां ? आम्ही बोलत नाहीं, म्हणून का तुमचीं हीं बोलणीं ? मी एकदां सांगेंत, माझ्या दादाला चोर म्हटलेलं मला नाहीं खपायचं ? घरांतलीं माणसं चोर असतात वाटतं ?

**केशव** : [संतापानें] थांब, थांब हां ! चोर असतात कीं नाहीं तें सांगतों तुला ! चोराची साथीदार तूं-ताई, ताई, अगोदर इकडे ये-[रागानें लाल झालेल्या माई व प्रेमाबाई येतात.] ही कारटी, तुझ्या हातचा मार मिळाल्याशिवाय नाहीं वळायची !

**माई** : नाहीं ना कबूल होत ? नाहींच व्हायची ती ! तशी ती मख्ख आहे. ती कशाला कबूल होईल ?

**केशव** : विचारलं तर रडायला लागली—

**माई** : रडेल-रडेल. न रडायला काय झालं ! रडलं म्हणजे केलेलं जिरतं ना ? कालची कारटी आम्हांला शिकवत आहे. कायग ए, बऱ्या बोलानं कबूल करतेस कीं नाहीं ?

**कमला** : काय कबूल करूं ?

**माई** : काय कबूल करूं ? उलट मलाच विचारतेस ? सांगतें हं काय कबूल करायचं तें ! प्रेमाबाई, ती पलीकडली धुणीं वाळत घालायची काठी आणा पाहूं अगोदर ? नाहींतर तुम्ही घ्या बाबूला, मीच आणतें ती काठी-उलट बोलतेस ?

**केशव** : मलादेखील उलट बोलायला लागली. मी त्याच वेळीं श्रीमुखांत भडकावणार होतों तिच्या—

**माई** : प्रेमाबाई, उभ्या राहूं नका तुम्ही ! कारटीची गय करायची ही वेळ नव्हे ! अगोदर काठी आणा. (प्रेमाबाई काठी आणायला जाते, माई कमीचा कान धरते) कबूल काय करायचं तें सांगूं होय ? केशवानं सांगितलेले कळलं नाहीं वाटतं ? तुझ्या भावानं माझी 'पेटी फोडली आहे' हें कबूल करायचं, समजलीस ? फोडली कीं नाहीं पेटी ?

**कमला** : नाहीं-नाहीं !

**केशव** : कशावरून नाहीं ?

**कमला** : मी सांगतें म्हणून ! माई, माझा कान सोडा–अग आई ग–माझ्या कानाला कळ लागली–कान सोडा माई—

**माई** : तूं सांगतेस म्हणूनच ! तुझ्याकडूनच ‘ होय ’ म्हणून काढून घेतें बरं का ? मस्तवाल कारटी ! चुरुचुरु बोलायला लागली जीभ–जीभच कापून टाकतें. वडीलधारीं माणसं दिसेनाशीं झालीं इतक्यांत ? तुला मारलं म्हणजे—

**कमला** : माई, मला मारलं म्हणजे दादानं चोरी केली असं होईल का ! मला मारायचंच असेल तर खुशाल मारा, चकार बोलत नाहीं मी ! पण माझा दादा–चोर आहे असं म्हणूं नका ! माझा जीव घ्या वाटेल तर—

**माई** : अं–अं ! इतकी तयारी केली आहेस का ? मारूनच टाकतें बरं का आतां ! केशव, हिला आतां मारायचंच हं–( प्रेमाबाई काठी घेऊन येते. ) प्रेमाबाई, कारटीची काठीनं पाठ फोडा अगोदर–मागं घेऊं नका अशा–नाहीं ना तुझ्या भावानं पेटी फोडली ?

**कमला** : नाहीं–नाहीं–नाहीं !

**केशव** : नाहीं तर त्या पेटीची किल्ली उत्तमानं खिशांत कशाला नेऊन ठेवली होती ? कशी गेली त्याच्या खिशांत किल्ली ?

**कमला** : तें कुणाला माहीत ? तुम्हींच कोणी नेऊन ठेवली असेल ?

**माई** : वाहवा ग वाहवा ! म्हणे आम्हीं कुणीं ठेवली असेल किल्ली त्याच्या खिशांत ? म्हणजे आम्ही करून तुझ्या भावावर खोटंच कुभांड करतों म्हणेनास ?

**कमला** : मी कशाला तसं म्हणूं ?

**प्रेमा०** : काय ग बाई मुलगी अगोचर तरी !

**माई** : प्रेमाबाई, फोडा म्हणतें ना तिला ! फोडा–फोडा. नाहीं तर केशवा, घे ती काठी अन् ओढ कारटीच्या पाठीवर. येऊं दे आमचा हात धरायला कोण येतं तें !

**केशव** : ही त्या अमृत्याची फूस ! नाहींतर यांचीं काय तोंडं होतीं, असं उलट बोलायला ? प्रेमाबाई, तुम्ही पहात काय उभ्या राहिलांत, ओढा दोन काठ्या !

**प्रेमा** : कमे, उगाच मार कां खातेस ! कबूल कर, अग कारटे–( काठी मारते. )

**माई** : मारा–मारा—

**कमला** : ( ओरडते ) अग आई, मेलें–मेलें—

**माई** : मर-मर-! दुनिया ओस नाहीं पडायची! असली अवलक्षणी कारटी मेलेलीच काय वाईट?

**कमला** : मेलें-मेलें-धांवा, धांवा—(अण्णासाहेब व अमृतमामा प्रवेश करतात.)

**अण्णा** : कोण ओरडलं? काय चाललं आहे?

**कमळा** : (अण्णासाहेबांकडे धांवत जाऊन) अण्णासाहेब, मला मारताहेत-हो मला मारताहेत!

**अण्णा** : कां? कां? कोण मारतो? (प्रेमाबाईस पाहून) कोण प्रेमाबाई, तुम्ही कमीला मारतां? कमीनं तुमचं काय केलं? कमू, बाळ रडूं नकोस. तुम्ही का हिच्यावर हात उचलतां? [माईंना] आणि तुम्ही जवळ उभ्या राहून स्वस्थ बघतां? काय आहे हें? काय केलं मुलीनं? झालं काय?

**अमृत** : अण्णासाहेब, बाहेरचीं माणसं येऊन तुमच्या मुलांना मारताहेत, हें झालं आहे!—

**अण्णा०**: [रागानं माईला] मी तुम्हांला विचारतों आहें, काय केलं कमीनं? काय ग कमू? काय झालं?

**कमला** : मी कबूल करीत नाहीं, म्हणून मला मारून कबूल करायला लावताहेत!

**केशव** : ताई तिला सरळ विचारते आहे!

**अण्णा** : काय? मुलीकडून असं जबरदस्तीनं काय कबूल करून घेणं चाललं आहे? तुम्ही बोलत कां नाहीं? काय झालं आहे? (कांगावखोरपणानं माई रडूं लागतात) तुम्ही रडायला लागलांत? मी विचारतों आहें कीं काय झालं? तुम्ही कां रडायला लागलांत? झालं काय?

**माई** : (रडत रडत आंत जाऊन पेटी आणतात व अण्णासाहेबांच्या पुढें आदळतात) हें पाह्यचं काय झालं तें? माझी दागिन्यांची पेटी उघडून चिरंजिवांनीं दागिने पळवून नेले आहेत! आणखीं काय व्हायचं?

**अण्णा** : (ओरडून) काय, मुलगा दागिने घेऊन पळून गेला?

**कमला** : नाहीं-अण्णासाहेब, नाहीं! दादावर हें कुभांड आहे. यांतलं दादाला कांहीं माहीत नाहीं!

**माई** : गप बैस कारटे! पहातें तों पेटीला कुलूप तसंच आणि आंत जिन्नस मात्र नाहींत. कुलूप कायम ठेवून आंतले जिन्नस न्यायला बाहेरचा चोर येतो का? किल्ली पण त्याच्याच खिशांत सांपडली!

**प्रेमा** : ( स्वगत ) असंच शेवटपर्यंत टिकलं पाहिजे !

**कमला** : अगदीं खोटं. अण्णासाहेब, दादाचा कांहीं अपराध नाहीं !

**अण्णा** : चल दूर हो–बोलूं नकोस. ( कमीला ढकलून देतात ती अमृता-कडे जाते. )

**अमृत** : ( थांबवून ) हं, माझ्याजवळहि येऊं नकोस. तुझ्यावर आणि तुझ्या भावावर चोरीचा आरोप आहे तो निघेपर्यंत तुला एकटीलाच उभं राहृयला पाहिजे. निराधार रहा आणि आधारच पाहिजे असेल तर–( प्रेमाबाईच्या हातां-तील काठी घेऊन ) ही काठी घे हातांत ! हीच तुझा आधार आहे !

**अण्णा** : कारट्याचा नम्रपणा पाहून तो निवळला असं वाटून मला कोण धन्यता वाटत होती !–पण त्याचा तो नम्रपणा नव्हता; तर आमच्या सर्वांच्या डोळ्यांत धूळ फेंकण्याकरितां बकासारखी त्याची ती कपटाची समाधी होती. मुलगा मला सिंहगडला जातों म्हणून विचारून गेला—

**केशव** : कुणाला संशय येऊं नये म्हणून त्यानं युक्ति केली ती ! कमीनंच सांगितलं पहिल्यादां—

**कमला** : नाहीं–अण्णासाहेब नाहीं !

**माई** : आणखीं त्याच पेटींतील, मृत्युपत्राचं पाकीटसुद्धां हरवलं तें तरी दुसरं कोण नेणार ?

**अण्णा** : मग शंकाच नाहीं ! कारट्यांचंच कृत्य तें ! अरेरे ! मुलगा दरवडेखोर निघाला ! छे ! छे ! छे ! भलतंच झालं ! मीं म्हटलं मुलगा निवळला ! कारट्यानं कुळाच्या अब्रूला कायमचं ग्रहण लावलं ! नाहीं, नाहीं, हें सहनच होत नाहीं ! माझ्या संसारसुखाची माती माती केली कारट्यानं ! असलं कार्टं परमेश्वरानं माझ्या पोटीं जन्माला तरी कशाला घातलं ? जारे, अगोदर कुणी पोलिसांत वर्दी द्या. कारट्याला असेल तिथून पकडून आणा. त्याला येरवड्याची हवा खायला पाठविलंच पाहिजे–अरे कुणीच कां जात नाहीं ? उशीर करूं नका. केशवराव, तुम्ही जा फरासखान्यांत अगोदर !

**माई** : ( स्वगत ) आतां होईल आमच्या मनासारखं !

**अमृत** : ( गंभीरतेनें ) हां ! केशवमामा, जाऊं नका तुम्ही. अण्णासाहेब, आपण हें काय आरंभलेंत !—

**अण्णा** : अहो, जा केशवमामा !

**केशव** : हा चाललों—

**अमृत** : ( आडवून ) जाऊं नको म्हणून सांगतों ना तुला ?

**अण्णा** : अरे त्यांना कां आडवतोस ? पोलिसकडे जाऊं दे ! वेळ झाला तर कार्टे लवकर हातीं लागायचं नाहीं. दरोडा घातला पोट्ट्यांनं घरावर ! पोलिसांना कळवूं नको तर काय करूं

**अमृत** : अण्णासाहेब, कोण म्हणतो दरोडा घातला ? दरोडा घातला नाहीं. अण्णासाहेब, तुमच्या घरांत चोरी कोणी केली नाहीं ! चोरीच जर झाली नाहीं, तर पोलिसांत वर्दी द्यायचं कारण काय ? चोरी झाली कशावरून ?

**माई** : कशावरून म्हणजे ? अहो, माझ्या पेटींत दागिने नाहींत; चोरून नेले नाहींत, तर झालं काय त्यांचं ?

**अमृत** : अहो माई, तुम्हीं विसरून हातावेगळे दुसरीकडे ठेवले असतील. उत्तमानंच दागिने चोरले असं म्हणायला काय आधार आहे हो तुमच्याजवळ ?

**केशव** : अहो अमृतमामा, या पेटीची किल्ली उत्तमाच्या खिशांत सांपडली. शिवाय या तुमच्या भाचीनं कबूल केलंय कीं-( स्वगत ) अमृत्या, भरलीं तुझीं शंभर पुरीं—लक्षांत ठेव.

**अमृत** : ( स्वगत ) तयारी तर खूप तडफींची करून ठेवलेली दिसते. ठीक आहे. ( उघड ) तुम्हीं मारून जर कबूल करायला लावलंत, तर माराच्या भीतीनं एवढीशी पोर चटकन् कबूल झाली असेल. पण त्यांत काय अर्थ आहे ? अण्णासाहेब, दृष्टि अंध होऊं देऊं नका. एकवार तुम्ही तुमच्या मुलीच्या निष्कपट तोंडाकडे नजर द्या आणि त्यावर तुम्हांला काय दिसतं तें सांगा ! अण्णासाहेब, मी म्हणतों तुमच्या घरीं चोरी झालीच नाहीं; आणि चोरी झाली असेल तर ती उत्तमानं केली असं म्हणतां येणार नाहीं. उत्तमानं केली असं म्हणायचं असेल, तर ती चोरी मीं केली, ती केशवमामानं केली, माईनं केली, प्रेमाबाईनं केली ! अण्णासाहेब, आपल्याच हातून ती चोरी झाली, असं मला म्हणावं लागेल ! उत्तम—कमळीवरच संशय घेण्याचं कारण काय ? हीं मुलं पोरकीं आहेत म्हणून ? अण्णासाहेब, मी उत्तम—कमळीची बाजू घेऊन बोलतों असं समजूं नका, पहा—मुलीला मारतांना, तुम्हीं जवळ येतांच ती तुमच्याच आश्रयाला आली, अण्णासाहेब, अजूनहि आपल्याला वाटतं मुलांनींच दागिने चोरले म्हणून ?

**माई** : वाटायचं काय ! खात्री व्हायला पुढंच आहे कीं सर्व ! नाहीं ग बाई,

मुलं काय करतील अन् काय नाहीं, नेम नाहीं त्यांचा–दागिने मुलांनींच नेले, दुसरं कोणी न्यायचं नाहीं. पाकीटदेखील नेलंन काट्यांनं! त्याला वाटलं असेल 'मृत्युपत्र' पळवून नेलं म्हणजे माईच्या बाबूला भिक्षा मागायला लागेल; त्याचं कांहीं आपण देणं लागणार नाहीं!

**अण्णा** : छे–छे, माझं मस्तक अगदीं सुन्न झालं! (खालीं बसतात)

**माई** : अमृतमामा, पहा–पहा–तुमच्या भाच्याची तयारी! आतां त्याचा कैवार घेऊन काय करणार तुम्ही? असल्या भकलेल्या कार्ट्यांना ताळ्यावर आणण्याकरतां तुरुंग दाखविल्याशिवाय सोय नाहीं. जा रे केशव तूं, उभा राहूं नको, पोलिसांत जा अगोदर–या घराण्याची अब्रू—

**अमृत** : असं म्हणतां? तर मग अगोदर पोलिसांत वर्दी जाऊं दे. जा, केशवमामा, अगोदर जा, उत्तमाला पकडून आणा—

**केशव** : हा निघालों—[ स्वगत ] न सांगून काय करतोस आतां? अमृत्या, तुझी घडपड आतां फुकट आहे रे—

**अमृत** : माईसाहेब, आतां तुमच्या मनासारखं होऊं द्या. पण लक्षांत ठेवा, तुमचं घर सावत्रपणाबद्दल जगप्रसिद्ध आहे; तेव्हां जर कां तुमच्या कल्पनेच्या उलट झालं, तर पश्चात्ताप मात्र करून घेऊं नका. तुमच्या मुलांच्या ध्यानीं मनींसुद्धां कुळाच्या अब्रूला धक्का लावण्याचं आलं नाहीं, पण तुम्हीं मात्र आपली अब्रू घालवायाचीच असा निश्चय केलेला दिसतो. तुमच्या मनासारखं होऊं द्या. कल्पना करा, आतां पोलिस आले, पोलिसांची दृष्टि तुमच्याप्रमाणं अंध झालेली नसते, त्यांच्या कर्तव्याप्रमाणं त्यांनीं जर तुम्हांलाच विचारलं, कीं सावत्र मुलाला घरांतून घालविण्याकरितां दागिन्यांची गडबड तुम्हींच केली असून, मुलांच्या गळ्यांत आणीत आहांत–तुम्हीच चोर आहांत; असं जर त्यांनीं विचारलं [ माई व प्रेमाबाई दचकतात ] तर मग तुम्ही काय उत्तर द्याल? माईसाहेब, तुम्हांला माहीत नाहीं. पोलिसांच्या तावडींत सांपडूं नये. आणि एकदां सांपडलं, म्हणजे मग 'भीक नको पण कुत्रा आवर' म्हणण्याची पाळी येते! अण्णासाहेब—

**अण्णा** : अमृत!

**अमृत** : झाला हा प्रकार ठीक झाला असं आपल्याला वाटतं काय?

**अण्णा** : [ भ्रमिष्टपणानें ] अमृत, काय झालं? मीं काय केलं? अमृत, मला वेड लागलं! [ माई त्यांच्याजवळ जातात. ]

**अमृत** : कां वेड लागणार नाहीं ?

**माई** : आतां काय करूं मी ? असं काय करायचं ? कार्ट्यांनीं काय केलं हें ?

**अमृत** : माईसाहेब, कार्ट्यांनीं कांहीं केलं नाहीं, तुम्हीं केलंत हें ! आतां माझ्या-कडे रागानं बघून काय होणार ? माईसाहेब, तुम्हींच नाहीं केलंत हें ? अन् मी म्हणतों, क्षणभर असं धरून चला कीं, उत्तमच दागिने घेऊन पळून गेला; पण उत्तम हा कोण हो ? ह्या घराचा मालकच ना ? तुम्ही त्याच्या सावत्र झालांत तरी आईच आहांत ना ? मग तुम्हीच सांगा, आईच्या स्वभावाला शोभेल असं केलंत का तुम्हीं ? तुमचा बाबू या वेळीं मोठा असता, त्याच्या हातून जर खरोखरच असं कांहीं झालं असतं, तर उत्तमाप्रमाणं तुम्ही त्याला पोलिसाच्या स्वाधीन करायला तयार झाला असतां काय ?

**अण्णा** : अमृत—जा जा, तूं असाच जा आणि केशवाला परत घेऊन ये. माझ्या घराचे पुढचे सोहाळे व्हायला नकोत. जा केशवाला घेऊन ये !

**अमृत** : येऊं द्या अण्णासाहेब पोलिसांना म्हणजे, जर खरोखरच चोरी झाली असेल तर उमगेल तरी ! चोर सांपडायला पाहिजे—( माईला ) माईसाहेब, मला माहीत आहे कीं, उत्तम निष्कलंक ठरणार. चोरी सांपडणार. चारहि सांपडणार ! इतकंच नव्हे तर चोरीवर आपणांला दंडसुद्धां मिळणार आहे. पण माईसाहेब, उत्तमावर इतका दांत धरलांत याचं मला वाईट वाटतं. उत्तमानं तुमचं कांहीं एक वाईट केलं नसतं—उत्तम तसा नाहींच. पण तुम्हीं मात्र सावत्रपणा गाजवायला कमी केलं नाहीं. माईसाहेब, सावत्र मुलं वाईट निघतील, नाहीं असं माझं म्हणणं नाहीं. पण तीं वाईट निपजायला अंशतः तुम्ही वडील माणसं कारण होता, असं नको का म्हणायला ? माई, माया लावली तर जन्मवांझेला पान्हा फुटतो, मायेच्या एका शब्दोच्चाराबरोबर जंगली पशूहि आपल्या सभोंवार जमतात. मग उत्तम—कमी तर काय मनुष्याच्या जन्माला आलेलीं आहेत. तुम्हीं वरवर जें प्रेम दाखवलंत, तेंच अंतःकरणापासून असतं तर—

**माई** : होय हो, मुलंच तशीं गुणी पडलीं कीं नाहीं ? मला काय माहिती नाहीं त्यांची ? लहानाचीं मोठीं मींच त्यांना केलीं आहेत—मला काय माहिती नाहीं मुलांचा स्वभाव म्हणून समजतां ? असलीं मुलं असल्यापेक्षां नसलेलीं बरीं—देव जर त्यांना जिवंत ठेवूं लागला तर देवाची चूक आम्हांला दुरुस्त करावी लागेल. काय हो प्रेमाबाई ?—

**प्रेमा** : हो ! हो !—

**अमृत** : अरेरे ! माईसाहेब, किती अधःपात करून घेतां आपला ? तुमच्या बोलण्यांत कांहीं तरी अर्थ आहे का ? तुम्ही काय बोललांत तें तुमचं तुम्हांला तरी समजलं का ? माणूस एकदां घसरायला लागलं, तर शेवटपर्यंत कसं घसरतं तें पहा ! माईसाहेब, पाण्यांत बुडणाऱ्याला काडीच्या आधाराचा उपयोग कधीं झाला आहे का ? अरे रे ! माईसाहेब, मला तुमची कींव येते. पुढं काय होणार याचं मूर्तिमंत चित्र माझ्यापुढं उभं राहातं आहे ! पोलिस आल्यावर मला नाइलाजानं कठोर बनावं लागणार आहे !

**अण्णा** : अमृत, काय म्हणतो आहेस तूं ? पुढं काय होणार आहे ?

**अमृत** : अण्णासाहेब, आणखीं पुढं काय व्हायचं राहिलं आहे ? आतां काय व्हायचंच असेल तर तें चांगलंच होईल ! अण्णासाहेब, माईसाहेब, सत्य कधींहि लपून रहात नाहीं. योग्य वेळीं तें प्रकाशमान होणारच; आणि खोट्याच्या कपाळीं गोटा बसल्याशिवाय कधींहि रहाणार नाहीं !

**अण्णा**: होय बाबा—अमृत, तूं म्हणतोस तेंच खरं ! आतां माझ्या डोक्यांत प्रकाश पडला. पण पश्चात्‌बुद्धि काय कामाची ? माझी कंबरच खचली—[माईंना] काय बरं केलंत ?

**अमृत** : अण्णासाहेब, हें केलं पहा माईंनीं—

[ पोलिस उत्तमाला धरून आणतात. केशव व भय्यासाहेब येतो. पोलिस आलेले पाहून माई व प्रेमाबाई घाबरतात. ]

**केशव०**: हा आणला चोराला पकडून पोलिसांनीं ! स्वगत ] सिंहगडाहून इकडेच येत होता [ उघड ] याला युक्तीनंच पकडावा लागला. नाहीं तर हातीं लागत नव्हता. [ स्वगत ] अमृत्या, गाशा गुंडाळ आतां येथून !

**भय्या** : [ स्वगत ] अरेरे ! या संभावित घराण्याचे काय धिंडवडे व्हायला लागले हे !

**अण्णा** : [ कपाळावर हात मारून ] अरेरे !

**अमृत** : अण्णासाहेब, आतां 'अरेरे' करून काय होणार ! जें व्हायला नको होतं तें झालं. आतां तें पुरतं व्हायला पाहिजे. केशवमामांनीं उत्तमाला पोलिस-कडून पकडून आणलंच आहे. पण अण्णासाहेब, उत्तमाला निष्कलंक ठरविण्याचं आणि खऱ्या चोरांना पकडायचं सामर्थ्य माझ्या अंगांत आहे ! खरे चोर मीं

दाखवून दिले, तर तें तुम्हांला पाहवणार नाहीं आणि सहनहि होणार नाहीं, पण त्याला माझा नाइलाज आहे. जें जें होईल आणि जें ज दिसेल तें पाह्यला आपल्याला तयार झालेंच पाहिजे. अण्णासाहेब, हा वेळपर्यंत माईनीं आणि केशवमामांनीं आपल्या प्रयत्नांची शिकस्त करून हा प्रसंग इथपर्यंत जमवून आणला आहे. आतां मलाहि उघड झालें पाहिजे. आतां मी आपल्याला स्पष्ट सांगतों कीं, आपल्या घरीं चोरी झाली आहे, ही गोष्ट खरी आहे. माईनीं उत्तमाला चोर म्हणून पोलिसच्या ताब्यांत दिला. मलाहि आतां माझे चोर पोलिसच्या ताब्यांत दिले पाहिजेत! अण्णासाहेब, ऐका, खरा चोर एक नसून खरे चोर तीन आहेत; आणि तें मी आतां या पोलिसांच्या स्वाधीन करतों. पहिला चोर ही प्रेमाबाई—

**प्रेमा** : [ गांगरून ] कोण ! मी ?

**अमृत** : होय तूं ! दुसरा चोर केशव !—केशव, गडबड करूं नकोस, एक अक्षर बोलूं नकोस; आणि तिसरा चोर—अरेरे ! हा प्रसंग यायला नको होता. पण आतां काय ? माईसाहेब, माफ करा, तिसरा चोर तुम्ही आहांत ! [ अण्णासाहेब, चकित होऊन पाहूं लागतात. माई मटकन् खालीं बसतात. ] अण्णासाहेब, मी उगीच कांहीं तरी बोलतों असं मात्र समजूं नका. माझ्याजवळ चोरीचा मुद्देमाल आहे. या त्रिकुटानें मृत्युपत्राचें पाकिट उत्तमानें नेलें म्हणून म्हटलें, पण तें आपल्या टेबलाच्या ड्रॉवरांतच आहे ! [ जाऊन आणतो. ] हें पहा तें ! आतां राहिले दागिने. त्याची एकंदर हकीगतहि आपल्याला आपल्याच पिढीजाद विश्वासू नोकराकडून—शाळिग्रामाकडून ऐकवितों, म्हणजे शंकेला जागा राहणार नाहीं ! ( शाळिग्राम—' मामा, अमृतमामा,' अशा हांका मारीत येतो. त्याच्याजवळ दागिने असतात. ) ये ये बाबा, अगदीं वेळेवर आलास. अण्णासाहेब, या चोरीला गेलेल्या दागिन्यांची ही यादी, हें चोरीच्या खुलाशाचं पत्र ! तात्यासाहेब इनामदारांचें हस्ताक्षर आहे. वडिलांचं अक्षर भय्यासाहेब ओळखतीलच. ( पत्र दाखवितो. ) आपल्या वाडिलांचंच अक्षर का हें ?

**भय्या** : होय, तात्यासाहेबांचेंच अक्षर हें !

**अमृत** : शाळिग्राम, तात्यासाहेबांनीं दागिने व पत्रं दिलीं, त्या वेळीं ते काय म्हणाले, सांग !

**शाळि०** : मी आपलं पत्र इनामदारांना जेव्हां घेऊन गेलों होतों, त्याच वेळीं

ही प्रेमाबाई तिकडे आली होती. हिचं माहेरच तें खेडं. मी इनामदारांच्या जवळ बोलत असतां प्रेमाबाईचा भाऊ तिथें आला. त्यानें दागिने काढून त्यांच्यापुढें ठेविले आणि हे माझ्या बहिणीचे आहेत, तिच्या नवऱ्याला कोणाचीशी जामिनकी भरायची आहे, आणि दागिने मोडण्याखेरीज त्यांना उपाय नाहीं म्हणून बहीण हे दागिने घेऊन येथें आली आहे असें सांगितलें. इनामदारांनीं दागिने घेतले. माझें लक्ष गेलें तों मी चकितच झालों! दागिने आपल्या घरचे—उत्तम कमळीच्या आईचे! प्रेमाबाईचा भाऊ गेल्यावर मीं त्याची चौकशी केली आणि हे दागिने आमचे आहेत, यांत कांहीं तरी भानगड आहे असें स्वच्छ त्यांना बोलून दाखविलें. त्यांनीं तो प्रेमाबाईचा भाऊ असून प्रेमाबाई तुमच्याच गांवीं दिलेली आहे, म्हणून सांगितलें. प्रेमाबाईचं नांव घेतांच माझी खात्रीच झाली! ती दागिन्यांची यादी व दागिने घेऊन मी त्याच वेळीं आलों! का प्रेमाबाई, खरें आहे ना हें? ती ही दागिन्यांची यादी, हे दागिने आणि या प्रेमाबाई,! विचारा त्यांना—

**अमृत** : शाळिग्राम, पुरे कर! [ अण्णासाहेबांना मूर्च्छा येते. ]

**अण्णा** : [ सावध होऊन ] अरेरे! सारी सृष्टीच विपरीत झाली! [ माईस ] माझ्या सरळ व साध्या स्वभावाला केवढा धक्का दिलात ? हा धक्का माझा अंत करणार! माझा अवतार संपविणार! संपलाच माझा अवतार! आपण काय केलंत हें आणि कशाकरितां ?

**माई** : ( रडत ) चुकलें—चुकलें मी! सर्वस्वी अपराधी आहें मी. ( पायां पडते. )

**पोलिस** : ( स्वगत ) हा तर सगळा घरचाच सांवळागोंधळ आहे; यांत कांहीं अर्थ नाहीं!

**भय्या** : मामा, या अपराध्यांना सोडूं नका! या अपराध्यांनीं उत्तमाला पोलिसच्या स्वाधीन करतांना दयामाया दाखविली होती का ? अपराध्यांना शासन झालेंच पाहिजे!

**अमृत** : भय्यासाहेब, आपणांला तसं करतां येणार नाहीं. बायकांच्या बुद्धीनं सर्व झालेलं आहे. आतां आपण याच्या पुढची पायरी घेऊं लागलों तर त्यांत अण्णासाहेबांची अब्रू चव्हाट्यावर येणार आहे. तसं उपयोगी नाहीं. तुम्हांला, या सर्व चोरांना शिक्षा व्हावी असं वाटत असेल तर ती घरांतसुद्धां करतां

येण्यासारखी आहे. तुमची भावी पत्नी हातांत काठी घेऊन उभी आहे, तिलाच शिक्षा करायला सांगा म्हणजे झालं! [ तारवाला येतो. ]

**तारवाला :** 'उत्तम अनंत देशपांडे'–तार आहे.

**भय्या :** ( तार घेतो व वाचतो ) उत्तम अनंत देशपांडे, स्टॅंड्स फर्स्ट; इनाम-दार पासीस्!

**अमृत :** माईसाहेब, ऐकलंत ? सर्व जग या वेळीं तुमच्याकडे कोणत्या दृष्टीनें पहात असेल याची कल्पना करा–आतां तरी आपलं वर्तन सुधाराल का ?

**माई :** पुरे–पुरे अमृत, आमच्या डोळयांत चांगलंच अंजन घातलंस–पुरे कर आतां!

**अमृत :** माई, या अमृताच्या अंजनाचा तुमच्यावर जसा परिणाम झाला, तसा इतर सावत्र समाजावर जर थोडा थोडा होईल, तर त्यापासून मला अधिक आनंद होईल!

**माई :** होईल–अमृत, तुझ्या मनाप्रमाणंच होईल. मी चांडाळणीनं माझ्या उत्तम–कमळीला कितीतरी बाई छळलं! बाळांनो, तुम्हांला मीं छळलं म्हणून राग कराल कां माझा ?

**उत्तम :** छे–छे माई, तुम्ही छळलं असं आम्हांला वाटतच नाहीं, तर मग तुमच्यावर रागवायचं काय म्हणून ? आपण आमच्या 'आई' आहांत. आईवर मुलं कधीं रागावतात काय ? आईवर मुलांना रागावतांच येत नाहीं!

**अमृत :** शाबास उत्तम.

**अण्णा :** [ मुलांना जवळ घेऊन ] अहाहा! माझीं मुलं कितीतरी सद्गुणी आहेत! आणि अशा मुलांचा नाश माझ्या मूर्खपणानं होत होता. परमेश्वर मुलांचा पाठीराखा होता म्हणून सर्व कांहीं ठीक झालं! उत्तम, तुझं अंतःकरण थोर म्हणूनच तूं असे उद्गार काढलेस! तरी पण अंधपणानं म्हण, मनाच्या दुबळेपणानं म्हण, किंवा बाईलवेडा झालों म्हणून म्हण, मीं तुझे अक्षम्य अपराध केले आहेत; त्यांची तूं मला क्षमा कर. झालेल्या अपराधांची, पित्यानं पुत्राची प्रामाणिकपणानं क्षमा मागणं, यांत सद्गुणी मुलाचे सद्गुण उज्वल होतात! अमृत, उत्तमाला मार्गी लावण्याचं काम आतां तुझं आहे. उत्तम, अमृताच्या आज्ञेबाहेर जाऊं नकोस. कमीचं लग्न माझ्या डोळयादेखत होऊं द्या.

